






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका






# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



संपादक

यशवन्त दिनकर पेंढरकर

वर्ष २०.वें ]  एप्रिल–जून १९४७  [ अंक १

अनुक्रमणिका





## अनुक्रमणिका



### शिवाय



मुद्रक— श्री. लक्ष्मण नारायण चापेकर,
आर्यसंस्कृति मुद्रणालय,
१९८/१७ सदाशिव पेठ, टिळक रस्ता,
पुणें २.

प्रकाशकः — रामचंद्र श्रीपाद जोग,
महाराष्ट्र-साहित्य परिषद्, टिळक रस्ता,
पुणें २.

### दुरुस्ती

प्रस्तुत अंकापासून 'पत्रिके'चें २० वें वर्ष सुरू होत आहे. पृष्ठ १ वर वर्ष २१ वें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. मागील अंक २० व्या वर्षातला नसून १९ व्या वर्षातील होय.

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका

वर्ष २१ वें ] एप्रील-जून १९४७ [ अंक १ ला


## अभंग छंद (३)* :


कवि : ना. ग. जोशी


[१]

प्रणयधामासी चाले वारकरी ।
अभंग ल्हरी । निनादती ।
चढत चढण, अुतरे अुतार ।
नामाचा गजर । मुर्ली गाजे ।
चाले वाळवंट ओसाड रेताड ।
गाअी गोड-गोड । भक्तिगान ।
आत्मरंगीं रंगे मन हें अखंड ।
परी तनु जड । भागलीच ॥

पोचला येअून बागेच्या शिवेला ।
कानांस भिडला । मंजु बोल ।
'कुठे रे निघाला वाटसरू राया ।
भागली रे काया । किती तरी' ।
अुघडी कवाड, फेंकीते नजर ।
ओती जलधार । ओंजळींत ।
तीच बाग बने प्रेमाची पंढरी ।
मनाच्या मंदिरीं । तीच मूर्त ॥

[२]

अनंतपंथींचा मी गे यात्रिकरी ।
पसरे अंधारी । निशा घोर ।
घोर तमांतून काढूनिया वाट ।
जीवनींचा पंथ । आक्रमीतों ।
कृपेची पांखर राहो रखुमाअी ।
हाची वर देअी । कृपावंते ।
तुझ्या आठवणी होवो खाणाखुणा ।
वाट चालतांना । अनवाणी ॥

वाटेवरी वाजे पाअूल आपलें ।
मागे कोण आलें । म्हणे मन ।
दिसे झाडझूड अंधुक कडेस ।
होतसे आभास । तुझा तेय ।
दूर कुठे होतां अस्फुट हुंकार ।
वाटे साक्षात्कार । अंतरींचा ।
पावलोपावलीं घोटाळे भ्रमांत ।
तुझीया प्रेमांत । अेकजीव ॥

[३]

विश्वसंसाराची भडकली होळी ।
झडप पाकोळी । त्यांत घाली ।
पोळुनियां पंख होअी लाहीलाही ।
कोणत्या अुपायीं । थंडावेल ।
थंडावा न मिळे, न मिळे विसांवा ।
किती गे सोसावा । दाह आता ।
सोशिकपणाची पराकाष्ठा केली ।
सर्वेची निमाली । दुर्बलता ॥

जगण्यांत जीवा वाटतो अुत्साह ।
भासत ना दाह । निराशांचा ।
साहण्यांत कष्ट होतसे आनंद ।
जगताचा छंद । लागे पुन्हा ।
निराशाच झाली आशेची जननी ।
गूढ शांती मनीं । राज्य करी ।
तुझीया प्रेमाची रीत विलक्षण ।
अन्ताच्या मागून । हो आरंभ ॥

---

* "अभंग छंद" नामक अप्रकाशित प्रणयी अभंगसंग्रहांतून.

[४]
न कळे कासया अुमाळा ये अुरीं ।
माझिया अंतरीं । कल्लोळ हो ।
न कळे कासया फुटते अुंपळी ।
कां गे रानकेळी । मोख धरी ।
होतां भूमीवरी पहिला वर्षाव ।
फुलतसे भाव । अंतरींचा ।
येतां पाणियाचा ओलावा अंतरीं ।
फोफावे बाहेरी । केळमोख ।
तेंवी तूं पहीला पाऊस शिंपला ।
ओलावा आणला । जीवनाला ।
तहानेली भूमी, सुकलेली केळ'।
हृदयीं स्नेहाळ । भाव धरी ॥

[५]
मज अेकाअेकीं भासे जग सुनें ।
विफळ हें जिणें । अैसें वाटे ।
आंतल्या आंतून येतसे अुमाळा ।
परी न मोकळा । मार्ग तया ।
वाटे बंधांतून जावें अुडूनीयां ।
अज्ञातीं घराया । अज्ञेयाला ।
कृत्रिमीं न रमे मनींचा चंडोल ।
हृदींचा बुल्बुल । बोलत ना ।
परी अुडूं कोठे विश्वांत अफाट ।
करूं किलबिलाट । कैसा शून्यीं ।
तुझीया अभावीं चंडोल हो दीन ।
खंगे स्नेहावीण । बुल्बुल गे ॥

[६]
हिरवी हिरवी गर्द आंबराअी ।
डोकावुनी पाही । गांवाकडे ।
डोंगरकपारीं थंड पाटपाणी ।
तयाच्या जीवनीं । अेकजीव ।
अनंताचें फुले टपोरेसें फूल ।
बहरे साईल । सांजवेळीं ।
शीतल, कोमल स्नेहाल पवन ।
सागरावरून । ये भेटाया ।
करवंदी-बोरें कांटेरी झुडुपें ।
अमूप हुरूपें । फळें देती ।
सांवळ्या राअीच्या लावण्याची छाया ।
रूपीं गे तुझीया । अुमटली ॥

[७]
रंगलें गायन गायक तल्लीन ।
नादब्रह्मीं मन । विलीन हो ।
गानाच्या लयींत विश्व चराचर ।
साथ दे चौफेर । अैसें भासे ।
ईश्वरभजनीं मग्न भक्तराज ।
ठेवी पदरज । माथ्यावरी ।
लागते तयास अखंड चाहूल ।
नसे काळवेळ । साक्षात्कारा ।
सखये, तुझीया नामसंकीर्तनीं ।
घुमे प्रतिध्वनि । चराचरीं ।
तुझीया भेटीचा भुकेला मी भक्त ।
तुज गे अव्याहत । पाहीं विश्वीं ॥

[८]
आषाढ मासींची सर पाअूसाची ।
अुसंत क्षणाची । नसे तीज ।
तंव बनराअी गांवखिंडींतली ।
पुरी डहुरली । गार गार ।
हिरवट पानें, पिवळीं ग फुलें ।
नींव बहरलें । रानींवनीं ।
कुड्याचीं झुडुपें बाजूस नाचती ।
फूलकुडीं देती । लतिकांना ।
वरून खाली ये पऱ्ह्या मधोमध ।
तयांत स्वच्छंद । तूंच न्हासी ।
आकाशगंगेचें फेसाळतां नीर ।
होअी चंद्रकोर । ही ओलेती ॥

[९]
पुराणग्रंथींचें वाचिलें वर्णन ।
शिवजटेंतून । वाहे गंगा ।
तियेच्या तुषारीं भिजते निथळ ।
कपाळीं सोज्ज्वळ । चन्द्रकोर ।
अजि म्यां पाहीलें दृश्य तेंच डोळां ।
नेत्रांसी सोहळा । आज लाभे ।
सुंदर तें ध्यान करितां प्राशन ।
मम गे लोचन । धन्य झाले ।
किती गे अधीर पातलों तुजसी ।
तद्रूप सृष्टीशी । अैसी होतां ।
सखे, विपदाह शमवी ती कोर ।
कां न तूं कैवार । न घे मम ॥

# अडका आणि सुपारी :

लेखकः—हरि केशव गोळे

## अडका

महाराष्ट्र साहित्यपत्रिकेच्या जानेवारी-मार्च १९४६ या अंकांत 'अडका' या शब्दाच्या व्युत्पत्तीबद्दल रा. शं. वा. जोशी यांचा लेख वाचला. तो हा की 'अडका' हा शब्द कानडींतील अडकी (अडिकॆ) म्हणजे सुपारी या शब्दावरून मराठींत रूढ झाला असावा; आणि त्यावरून त्यांचें पुढचें अनुमान असें की जसा पैसा तसा अडका हें तत्सम चलन असणारच. आणि अडका (मूळ कानडी शब्द अडकी) म्हणजे सुपारी; तेव्हा महाराष्ट्र-कर्नाटकांत पूर्वी सुपारी हें चलन असावें.

अशा जोड शब्दांतील दोन्ही शब्द एकाच अर्थाचे असतात हें त्यांचें म्हणणें सर्वमान्य मुळीच नाही. उदाहरणार्थ, पै-पैसा, किडा-मुंगी, विन्हाड-बाजलें, चहा-पाणी इत्यादि. या जोड शब्दांतील दोन्ही शब्द एकाच अर्थाचे नसून एकाच वर्गाचे वाचक आहेत. अशा शब्दांचा अर्थ अवयवभूत शब्दांचा समुदायवाचक असून तो समाहारद्वंद्व आहे. त्याच नमुन्याचा पैसा-अडका हा जोड शब्द. त्याचा अर्थ पैसा-अर्धापैसा आदिकरून मिळकत असा आहे. अर्धकः या संस्कृत शब्दाचा अडका हा अपभ्रंश अगदी सरळ प्राकृतव्याकरण नियमानुसार झाला आहे. विसर्गाच्या ऐवजी आ असा दीर्घ आदेश झाल्यामुळे उपान्त्य ड्‌ढ चा ड झाला आहे. अर्धकः—अड्ढकः—अडका. साडेतीन हेंहि सार्ध-तीन याचें याचप्रमाणे रूप आहे. प्राकृत भाषांपैकी अर्धमागधीचा एक मोठा सचित्र कोष इंदूरचे शेट केसरीचंद भंडारी यांनी संपादिला आहे. त्यांतहि अड्ढ या शब्दाचा संस्कृत पर्याय असाच दिलेला आहे.

अडका याची अर्क-रूका अशी दूरान्वयाची दुसरी व्युत्पत्ति वाटली ती महाराष्ट्र शब्दकोषकारांनी नमूद करून ठेवली इतकेंच. अडकित्ता हा शब्द कानडींतून आला आहे हें त्या कोषकारांस मान्यच आहे. अशा शब्दांची यादी त्यांना मिळाली होती व तिचा त्यांनी उपयोग करून घेतलाच आहे.

अर्धक या नांवाचें नाणें व्यवहारांत असल्याचें अजून प्रत्ययास आलें नाही असें रा. जोशी म्हणतात. परंतु पै या नाण्याला आजहि मुंबई आणि ठाणें कुलाबा या भागांत अर्धी म्हणतात हें त्यांना माहीत नसावें. शिवाय अर्धा पैसा म्हणजे अधेला हें नाणें आजहि चालू आहे. आणि अधेली म्हणजे अर्धा रुपया त्यांनी आतापर्यंत कधी पाहिला नाही काय? आताचा अधेला याचाच पर्याय पूर्वीचा अडका. पैसा-अडका याचप्रमाणे त्याच अर्थी पैसा-अधेला हा शब्द आजहि आम्ही वापरतों. उदाहरणार्थ, प्लेगच्या दिवसांत झोपडींत राहायला जायचें असलें म्हणजे आम्ही म्हणत असूं की, "दिवस धोक्याचे, तेव्हा पैसा-अधेला, पै-पैसा काय असेल तें नीट बंदोबस्तांत ठेवा; झोपडींत नको."

रा. जोशी यांनी जे वाक्प्रचार दिले आहेत, त्यांत अडका म्हणजे अर्धा पैसा असाच अर्थ सरळ आहे. पण त्या ठिकाणीं त्याचा अर्थ सुपारी असा गृहीत धरून त्या त्या वाक्यांची त्यांनी चर्चा केली आहे. पण आरंभीं अडका म्हणजे सुपारी हा अर्थ स्वतंत्रपणें बाह्यप्रमाणांनी सिद्ध केल्यानंतर तीं उदाहरणें उपयोगी पडणारीं आहेत. तो अर्थ सुरवातीसच ठरला

तर पुढे आपोआपच ठरतो. आणि पहिल्यानेच नाही ठरला तर पुढेहि ठरत नाही. एकाच अर्थाची तीं स्वतंत्र उदाहरणें आहेत. स्वतंत्र प्रमाणें नाहीत. त्यांच्या विवेचनांत तर्कशास्त्रांत नेहमी येणारा दोष Petitio Principii म्हणजे begging the question हा आलेला आहे. म्हणजे सिद्ध करावयास सांगितलेलें विधान सिद्ध झालें आहे असें गृहीत धरून तोच पुरावा म्हणून पुढील विधानांना लावून तीं सिद्ध होतात असें म्हणावयाचें, असें त्या दोषाचें स्वरूप आहे.

आता त्यांनी दिलेल्या वाक्प्रचारांचा ओळीनें विचार करूं.

(१) "अडक्याची भवानी आणि बारा रुपयांचा गोंधळ" या म्हणीचेंहि त्यांनी असेंच केलें आहे. सुपारीरूप देवी (अडका) आणि बारा रुपये तिच्या गोंधळाला, असा विरोध दर्शविण्यांत अलंकारशास्त्राच्या भाषेंत चमत्कार नाही. देवी म्हटल्याबरोबर येथे पूज्यभाव प्रकट आला. मग ती देवी सोन्याची असो नाही तर मातीची असो. देवीच्या किंमतीचा प्रश्न नाही. देवीच्या मूर्तीवर खर्च करायचा अडका (पैसा) आणि गोंधळाला मात्र मोठी रक्कम अशा आचरटपणाच्या निषेधार्थ उपरोधिक विरोध तेथे अभिप्रेत आहे. गणपतीपूजन, देवदेवक, नांदीश्राद्ध वगैरे अनेक प्रसंगीं सुपारीची स्थापना देवतेच्या स्थानीं होते. आणि त्या त्या प्रसंगानें पुढे होणाऱ्या कार्यांत गोंधळाच्या कितीतरी पट खर्च होतो. मग तो प्रकारसुद्धा वरच्या म्हणीसारखा रा. जोशी यांच्या म्हणण्याप्रमाणे हास्यास्पद विरोधाचाच ठरेल. या प्रसंगीं सुपारीची स्थापना तिला दिल्या गेलेल्या मंगलत्वामुळे आहे.

(२) देवापुढे सुपारी ठेवतात ती नुसत्या दर्शनाचे वेळीं ठेवीत नाहीत. तेव्हा तेथे अडकाच (पैसाच) ठेवतात. कांहीं मंगलकार्यानिमित्त देवास निमंत्रण देतेवेळीं सुपारी ठेवतात

(३) ब्राह्मणांस किंचित् व्यावहारिक द्रव्य म्हणून सुपारी कधीहि देत नाहीत. असल्या व्यावहारिक द्रव्यावर जर ब्राह्मणांची बोळवण होऊं लागली तर आमच्या दारवंठ्याकडे ढुंकून तरी ते पाहतील का ?

(४) एखादा व्यवहार ठरला म्हणजे इसाऱ्यादाखल थोडी रक्कम देतात घेतात. तशी देवापुढे सुपारी ठेवणें किंवा ब्राह्मणास ती देणें म्हणजे कांहीं सौदा पटविल्याची ती खूण आहे कीं काय ?

(५) पहिली बोली म्हणजे इसारा म्हणून सुपारी देण्याची चाल कोठेहि नाही. नुसत्या सुपारीच्या इसाऱ्यावर व्यवहार ठरूं लागले तर तो घेणाऱ्याच्या अकलेची ती दिवाळखोरीच म्हणायची. सौदा मोडला तर देणाऱ्याची सुपारीच गेली, पण घेणारा मात्र पक्का बांधला गेला !

(६) लग्नकार्यानिमित्त वाजंत्री वगैरेंना सुपारी देतात त्यांत इसाऱ्याची भावना नसून धर्मविषयक मांगल्याची आहे. साध्या व्यवहारांत १०० रु. इसारा घेणारा माणूस प्रसंगच पडला तर दंड भरूनदेखील आपली सुटका करून घेईल. पण सुपारी घेणारा कांहीं झालें तरी फिरणार नाही. अनेक जातींत लग्ननिश्चय सुपारीनें करितात. तेथे सुपारी हा इसारा म्हणून कोणी समजतो काय ? पण रा. जोशी यांच्या म्हणण्याप्रमाणे तो देखील एक खरेदी-विक्रीचा सौदाच झाला ! आणि ब्राह्मणसमाजांतहि प्रत्येक संस्कारांत जिकडेतिकडे सुपारीचें महत्त्व आहे तें इसारा म्हणून नाणें या अर्थानें आहे काय ? आपल्या व्युत्पत्तीच्या भरांत हें सगळें ते स्वतः जोशी असून विसरून गेले.

(७) पहिल्या गिऱ्हाइकाकडून होणाऱ्या व्यापारास बोहनी म्हणतात. बोहणें म्हणजे हांक मारणें. पहिल्या हांकेलाच व्यापार झाला असा त्यांत शुभलक्षणसूचक अर्थ आहे. भवानी हा बोहनी या शब्दाचा गांवढळ पर्याय आहे. रा. जोशी समजतात तसा, म्हणजे देवी या, अर्थाशीं त्याचा कांही संबंध नाही. पण तो आहे असें धरलें तरी भवानी म्हणजे सुपारी असा अर्थ कसा होऊं शकतो? एकदा अडकारूप भवानी असें वरील म्हणींत ठरविल्याने जेथे तेथे भवानी येईल तेथे तेथे त्याचा अर्थ सुपारी असा संप्रदाय पक्का झाला म्हणायचा! "भवानी–अडक्याची–सुपारीची जरी झाली तरी" अशी सांखळी बोहनी म्हणजे भवानी (वास्तविक अपभ्रंश) या एका शब्दांतून बसविण्यास कल्पनाशक्ति फार जबरदस्तच पाहिजे.

(८) "सुपारीच्या खांडाचाहि मिंधा नाही" यांतहि सुपारी म्हणजे नाणें असें रा. जोशी समजतात. मिंधेपणाचा अत्यंताभाव दाखवायचा झाल्यास फुटक्या कवडीचाहि किंवा तुटक्या फाटक्या पैशाचाहि अशा तऱ्हेचे प्रयोग असतात कवडीच्या तुकड्याचाहि, किंवा पैशाच्या तुकड्याचाहि असें म्हणत नाहीत. कवडी-पैशासारखें हलक्यांत हलकें नाणें आणि तेंहि धड नाही, असा त्यांत भाव आहे. आणि त्यांतच स्वारस्य आहे. सुपारीच्या खांडाचाहि असें म्हणण्यांत त्याच्याहि पलीकडची पायरी आहे. फुटक्या कवडीचाहि असें म्हणण्यांत क्षुल्लक कां होईना पण कांही व्यवहार झाल्याचा दूरान्वयाने ध्वनि राहूं शकतो. पण सुपारीच्या खांडाचाहि मिंधा, या म्हणण्यांत अगदी क्षुल्लक शिष्टाचाराच्या पोटींहि मिंधा, असा अतिशयोक्ति अलंकार मोठ्या प्रकर्षाचा होतो आणि म्हणूनच त्यांत चमत्कार जास्त आहे.

कानडींत फार प्राचीन काळापासूनचे शेकडों दानविषयक शिलालेख व ताम्रपट उपलब्ध आहेत. त्यांत बारीक सारीक नाणीं, वजनें, मापें यांचे अनेक उल्लेख आले आहेत. त्यांत अडकी म्हणजे सुपारी हा शब्द नाणें या अर्थी आल्याचा उल्लेख सध्या तरी निदर्शनांत नाही असें एका तज्ज्ञाचें म्हणणें आहे.

अडका म्हणजे सुपारी हें नाणें रा. जोशी यांच्या म्हणण्याप्रमाणे फक्त कर्नाटक-महाराष्ट्रांतच होतें कीं इतरत्रहि होतें? सुपारीचें माहेर जो कोंकणपट्टीचा प्रदेश खाली कन्याकुमारीपर्यंत पसरलेला आहे, तेथे कोठे तुळु, मल्याळी, कोंकणी, तामिळ या भाषांत तसा उल्लेख सांपडतो काय हा मोठ्या गमतीचा शोध होईल.

कानडीमध्ये लिंगविचार फार सोपा आहे. मराठींतल्याप्रमाणे संस्कृतासारखा फार घोंटाळ्याचा नाही. अडकि हा शब्द कानडीच्या पद्धतीने नपुंसकलिंगी असला तरी आम्ही मराठी लोक साहजिकच स्त्रीलिंगी समजणार. आणि आमचा सुपारी शब्द तर स्त्रीलिंगीच आहे. म्हणून अडकी हा शब्द कानडींतून घेऊन तदर्थी ईकारान्त स्त्रीलिंगी सुपारी हा आमचा मराठी शब्द असतांना त्याचें पुल्लिंगीरूप अडका असें करून तें मराठींत रूढ होणें ही गोष्ट सर्वथा असंभाव्य आहे.

अडका आणि अडकी अशीं दोन्ही रूपें कानडींत निरनिराळ्या अर्थी प्रचलित आहेत त्याचें कारण काय? सुपारी या अर्थी अडय्-काय्, अडकाय्, अडक, अडकें असे द्राविडी भाषांत पर्याय येतात. पण त्याअर्थी कोठेहि अडका असा उच्चार नाही व तसें रूपहि नाही. तरी पण रा. जोशी म्हणतात 'अडका' हा शब्द— अर्थात् सुपारी या अर्थी सर्व द्राविडी दिसून येतो; आणि पुढे म्हणतात की प्राचीन कर्नाटकांत देखील अडकी म्हणजे सुपारी हें

नाणें प्रचारांत असावें. म्हणजे त्यांच्या म्हणण्यांतून असा स्पष्ट निर्णय निघतो की त्या अर्थानें मात्र त्याचें रूप 'अडका' असें होतें, बाकी सुपारी या अर्थानें तें अडकी असें होतें. तें कोणास पटत असेल कोण जाणे. मराठीसदृश वाक्प्रचार सोडून इतर कोठेहि सुपारी या प्रत्यक्ष अर्थानें– पर्यायानें किंवा लक्षणेनें नव्हे– द्राविडी भाषात अडका हा शब्द– अडकी नव्हे– सांपडतो की काय याचा शोध रा. जोशी यांनी करावा.

रा. जोशी यांनी दिलेल्या वाक्प्रचारांत जेथे जेथे अडका म्हणजे सुपारी असा अर्थ त्यांनी धरलेला आहे तेथे तेथे अडका म्हणजे अधेला हाच अर्थ समर्पक आहे. अडक्याची भवानी वगैरे ( १, २, ३ ) यांत अर्थाचा अनर्थ आणि ( ४, ५, ६, ७, ८ ) यांत अर्थहानि कशी आहे हें वर दर्शविलेंच आहे.

जुन्या कानडींत (हळेगन्नड) तद्भव म्हणजे संस्कृतोद्भव शब्द शेकडों आहेत. आणि त्यांचीं रूपें प्राकृत भाषानियमानुसारच बहुधा झालेलीं आहेत. त्यांतलाच हा अर्धक– अडका म्हणजे अर्धा पैसा, अधेला किंवा तत्सम जुनें कांही नाणें, हाच पक्ष सरळ ठरतो. आणि म्हणूनच अडका आणि अडकी हे दोन्ही शब्द कानडींत निरनिराळ्या अर्थी तेव्हापासून रूढ आहेत.

वास्तविक हा विषय येथेच संपला. परंतु सुपारी हें चलन होतें असें धरलें तर अगदी साध्या सरळ व्यवहारदृष्टीने काय काय प्रकार संभवतात तें पाहूं.

चलन अगदी लहान कां असेना, तें सहजासहजीं नाशवंत असतां कामा नये आणि तें साधारण एकाच आकाराचें असावें. आणि याच साध्या गुणांमुळे कवड्या प्रचलित झाल्या. आणि त्याच गुणांमुळे गुंजा आणि वाल यांचा वजनांत उपयोग होत आला आहे.

आता कवड्यांच्या ऐवजीं सुपारी या नाण्यानें काय प्रकार संभवतात तें पाहूं. समजा, सुपारी या नाण्याची ठिकीं व्यापाऱ्यांनी भरून ठेवलीं व तीं किडलीं किंवा भिजलीं तर त्यानीं काय करायचें ? आणि जेथे प्राचीन काळापासून लोक घरोघर सुपारी खात आले आहेत, तेथे तर या नाण्यांचा रोजच चक्काचूर होत राहणारा. मग या पैशाची शाश्वती काय, आणि त्याचा हिशेब कसा ठेवायचा ? आणि सुपाऱ्यांत पाहिलें तर अनेक प्रकार आणि आकार. त्यांत नाणें कोणचें ठरवावयाचें ? नाण्याच्या दृष्टीनें सुपारी तितकी सारखीच असें ठरविलें तर बारीक सुपाऱ्याच तेवढ्या नाणें म्हणून प्रचलित राहणार. मग मोठ्या सुपाऱ्यांचें काय व्हायचें ? Gresham's Law प्रमाणे,त्या चलनांत राहणारच नाहींत. मग त्यांचाच तेवढा खाण्याकडे उपयोग व्हायचा असें ठरलें ! बरें, सुपारी चोडांतून काढून नुसतीच वाळविली तर ती उलूं लागते आणि सहज फुटते. मग ती नाणें म्हणून कशी चालायची ? तेव्हा तिच्यावर ती टिकाऊ व्हावी म्हणून कांहीतरी क्रिया केली पाहिजे. याशिवाय खाण्याच्या दृष्टीनें ती तयार करण्याचे कांही प्रकार असणारच; उदाहरणार्थ–रोठा, बर्डी, चिकणी वगैरे हल्लीचे प्रकार. त्यांपैकीं नाणें म्हणून कोणचा तरी एक प्रकार ठरवणार कीं सगळेच नाणीं ? आणि त्यांचे भाव निरनिराळे राहणारच. मग सरकारमान्य प्रकाराचें अमुक सुपारी-नाणें आहे कीं नाही तें ठरवायला लोकांनी सुपारी-सराफांकडे गेलें पाहिजे ! सुपारी या नाण्याचें कवड्यांप्रमाणे पैशाला अमुक– ४, ८, १२–असें कांही सर्वमान्य प्रमाण ठरलेलें असणारच. एखाद्या वर्षी सुपारीचें पीक कमी आलें तर हें सरकारी प्रमाण कमी करावें लागणार आणि पीक चांगलें येईल तेव्हा वाढवावें लागणार ! आणि तेथेहि पुन्हा पंचाईत आलीच. १ पैशाला प्रमाण कमी ठरेल

तेव्हा खायला सुपारी मिळणार नाही; कारण जो तो ती नाणें म्हणून तिचा उपयोग करणार आणि तें जास्त ठरेल तेव्हा सुपारी हें नाणेंच कोठे दिसणार नाही ! त्यापेक्षा चिंचोका हें नाणें कितीतरी श्रेष्ठ प्रतीचें आहे. ते कोणी खात नाही, त्यांचा आकार सगळीकडे सारखा आणि प्रकारहि नाहीत. तें नसतें का आमच्या व्यवहारचतुर पूर्वजांना सुचलें ? सुपारीसारखा रोजच्या खाण्यांतला पदार्थ निरनिराळ्या जातींचा, आकारांचा आणि वजनांचा पदार्थ, दरसाल झाडास लागणारा पदार्थ आणि तो नाणें म्हणून उपयोगांत येणें ही कल्पनाच मुळी हास्यास्पद आहे. रानटी लोकांस पैसा म्हणून नाना तऱ्हेचे विचित्र पदार्थ उपयोगांत आल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. पण वेदकाळापासून कलाकौशल्य, व्यापारव्यवहार, आणि सोन्याचांदीचीं नाणीं अशा अत्युच्च सुधारणेच्या सर्व लक्षणांनी युक्त असे आमचे अत्यंत व्यवहारचतुर पूर्वज अगदी हलकें कां होईना पण सुपारीसारखें नाणें व्यवहारांत आणतील हें शक्य आहे काय !

बरें, सुपारी हें नाणें ठरल्यावर सुपारीचें झाड म्हणजे "पैशाचें झाड" उघडच ठरलें. ते पैसे तोडायचे एवढीच काय ती मेहनत. असा कल्पवृक्ष सांपडल्यावर जिकडे तिकडे अब्जावधि झाडें सुपारीचीं नसतीं का लोकांनी लावलीं ! मग "पैसे का झाडाला लागले आहेत" हें परिहासविजल्पित परमार्थवचन झालें असतें ! का ही म्हण सुपारी हें नाणें होतें, या आपल्या प्रतिपादनाला पोषक म्हणून रा. जोशी पुढे करणार आहेत ? बाकी, या म्हणी-वरून त्यांना असें म्हणतां येईल की पैसे झाडाला लागणें ही गोष्ट पूर्वीच्या लोकांना परिचित होती. आणि सुपारी झाडाला लागते म्हणून सुपारी हें नाणें असावें असें म्हणायला कांहीच प्रत्यवाय नाही !

अडकी या शब्दाची व्युत्पत्ति रा. जोशी यांनी सांगितली ती बरोबर आहे. त्यांनी दाखविल्याप्रमाणे कानडींत अड म्हणजे ढीग, रास, हा अर्थ आणि त्यांनी दिलेला त्या शब्दाचा घोंसफळ हाहि अर्थ बरोबर आहे. अडकाय् शब्दाच्या उत्तरार्धाचा अर्थ त्यांच्या-कडून राहून गेला तो असा. काय् म्हणजे (कच्चें) फळ. त्यावरून अडकाय्=घोंसफळ हा अर्थ उघडच बसतो. जातां जातां सुचवावेंसें वाटतें की घोंस हाहि शब्द कानडीवरूनच आला आहे. मूळ कानडी शब्द गोंच असा त्याच अर्थी आहे.

रा. जोशी हे कानडीचे चांगले अभ्यासी आहेत. परंतु त्यांचा मराठीचा व्यासंग जुजबी असल्याने एकदा एक कल्पना सुचून तिचाच पगडा त्यांच्यावर बसला. पण त्यांनी दोन्ही भाषांच्या अन्योन्यसंबंधाचा तौलनिक अभ्यास असाच चालवून तो मराठी वाचकांच्या पुढे ठेवीत जावा.

## सुपारी

येथे ओघानेच आल्यामुळे फार वर्षांपूर्वी टिपण केलेली सुपारी या शब्दाची व्युत्पत्ति पुढे मांडतों.

सुपारी हा शब्द ठाणें जिल्ह्यांतलें वसईच्या जवळचें समुद्रकांठचें गांव सोपारा त्यावरून आलेला आहे. हें गांव प्राचीन काळीं म्हणजे इ. स. च्या आधीपासून फार महत्त्वाचें बंदर होतें. या बंदरांतून पॅलेस्टीन, अरबस्तान, आफ्रिका, ग्रीस, रोम या देशांशीं फार मोठा व्यापार

चाले. त्या देशांत येथून सोनें, नाना प्रकारचीं रत्नें, चंदन, मौल्यवान् कापड वगैरे जिन्नस रवाना होत असत. आणि या बंदरांत परदेशचा माल उतरून तेथून गुजराथेंतून उत्तर हिंदुस्थान वगैरे भागांत पुढे जाई. महाभारतांत शूर्पारक या नांवाने याचा उल्लेख आहे. रोमन इतिहासकार प्लिनी याच्याहि ग्रंथांत या बंदराचा उल्लेख आहे. जुन्या करारांत (Old Testament) मध्ये सॉलोमनचीं जहाजें या बंदरांतून (ophir) वर सांगितलेला मौल्यवान् माल आणीत असा उल्लेख आहे.

महाभारतकाळीं उत्तरकोंकण म्हणजे रत्नागिरी भागांत वस्ती नव्हतीच म्हटली तरी चालेल. परंतु कारवारच्या खालची कोंकणपट्टी म्हणजे मंगळूरपासून खाली मलबार किनारा चांगला वसलेला होता. तेथून रोमशहरापर्यंत पूर्वी व्यापार चालत असे. खालून उत्तरहिंदुस्थानशीं व्यापार करायला पश्चिमकिनाऱ्यावर सोईचें असें सोपारा हेंच काय तें पहिलें बंदर असे. येथूनच तिकडचा माल गुजराथ, राजपुताना, मध्यदेश या भागांत जायचा. सुपारी हें फळ मूळ समुद्रकिनाऱ्याचें. तिकडून प्रथम तो जिन्नस हिंदुस्थानच्या म्हणजे गुजराथ-उज्जयनी-मध्यदेश या भागांत पाहिल्याने या सोपारा बंदरामार्फत लोकांच्या ओळखीचा झाला. म्हणून त्याला सोपारी हें नांव पडलें. सोपारा या बंदरांतून आलेली ती सोपारी. अजूनहि गुजराथी लोक सुपारीला सोपारी असेंच म्हणतात. पैठणावरून पैठणी, मथुरेवरून मथुरी, (तिकडील घाटाची घागर) गुजराथेंतील विसनगरावरून विसनगरी (चरवीसारखें भांडें), याप्रमाणेच तो शब्द.

पश्चिमेकडील देशांत प्राचीन काळीं या सोपारा बंदराची फारच ख्याति झाली होती. तेथे सोन्याचा धूर निघतो अशी त्या लोकांची कल्पना होती. सोपारा म्हणजे कल्पनातीत संपत्तिमान् आणि सर्वसुखसमृद्ध– प्रति स्वर्गच– अशी कीर्ति तिकडे पसरली होती. त्याचा उल्लेख Old Testament मध्यें ophir या शब्दाने आहे. त्याचा खुलासा असा. ठाणें जिल्ह्याला लागून जो गुजराथचा भाग अगदी सुरतेच्याहि पलीकडेपर्यंत आहे, त्यांत स-कारच्या जागीं ह-काराचा आदेश गुजराथी बोलींत आजहि होतो. त्याला अनुसरून सोपाराचें होपारा असें रूप रोमपर्यंत पसरल्याचें दिसतें. कारण तो दर्यावर्दी व्यापार बहुतेक गुजराथ–काठेवाड इकडील लोकांच्या हातांत होता. त्याचेंच तिकडे Ophir असें झालें. म्हणजे होपारा यांतील महाप्राणाचा परानियात झाला. पुढे कालान्तराने ते पुरातन कालचे व्यापाराचे मार्ग वगैरे बंद होऊन ophir हें नांव तिकडे नुसतें दंतकथेंत राहिलें. त्यानंतर गेल्या २०० वर्षांत Ophir हें कोठे होतें याबद्दल युरोपीय संशोधकांत मोठा अभ्यास सुरू झाला. त्यांपैकी कोणी म्हणत तें पूर्वआफ्रिकेंत होतें, कोणी म्हणत अरबस्तानांत होतें, कोणी म्हणत मलाका द्वीपकल्पांत होतें, आणि कोणी म्हणत सिंधु नदीच्या मुखाजवळ होतें. परंतु खरें Ophir म्हणजे हें सोपरा बंदर. त्या Ophir बद्दल तिकडील लोकांत इतकें कौतुक आहे की बादशहा सातवे एडवर्ड हे प्रिन्स् ऑफ वेल्स् असतांना त्यांचा साम्राज्यभर दौरा ज्या बोटीवरून झाला त्या बोटीचें नांव मोठ्या हौसेने Ophir असें ठेवलें होतें.

Ophir हें ठिकाण निश्चित करण्याबद्दल युरोपियन प्रवासी आणि संशोधक यांनी काय प्रयत्न केले व काय लिहिलें आहे, हा मोठा मनोरंजक स्वतंत्र विषय आहे.

---

# अनुष्टुभाचें स्वरूप :

ले०— श्री. य. ग. फफे, पुणें.

अनुष्टुभ् म्हणजे अष्टाक्षरी वृत्त ह्या अर्थाप्रमाणे तें मूळचें वृत्तांच्या एका मोठ्या वर्गाचें नांव आहे. अष्टाक्षरी चरणाचे लघुगुरुभेदाने २५६ प्रकार होतात म्हणून अनुष्टुभ् वर्गांतील समवृत्तेंहि २५६ संभवतात. यांपैकी विद्युन्माला, गजगती इत्यादि कांही वृत्तें प्रसिद्ध आहेत, पण महाभारतपुराणादि अपार संस्कृत वाङ्मय बहुतेक सारें ज्या अष्टाक्षरी वृत्तांत आहे तें कांही यांपैकी समवृत्त नाही. तें सारें वाङ्मय नानालघुगुरुभेदयुक्त अशा वृत्तांत असून त्यांसच श्लोक किंवा अनुष्टुभ् म्हणण्याची रूढि प्राचीन काळापासून पडलेली आहे. ह्या अनुष्टुभाच्याच स्वरूपाचा विचार प्रस्तुत करावयाचा आहे.

या अनुष्टुभाविषयी छंदोरचनेंत पुढीलप्रमाणे लिहिलें आहेः—"एका सुपरिचित परंतु वृत्तजातिच्छंदांपैकी कोणत्याच वर्गांत बसूं न शकणाऱ्या अशा एका पद्यप्रकाराचा विचार केला पाहिजे. तो पद्यप्रकार म्हटला म्हणजे श्लोक वा अनुष्टुभ् होय. याला छंद म्हणतात. पण यांत लगत्वभेद आहे. याला वृत्त म्हणावें तर लगक्रम निश्चित नाही आणि जाति म्हणावें तर कांही भाग वृत्ताप्रमाणे अचल आहे. आणि उर्वरित भाग निश्चित नाही. नि मात्रांची संख्याहि नियमित नाही (पृ. १०५)." पण छंदोमंजरी वगैरे पुष्कळ संस्कृत छंदोग्रंथांत याची गणना वृत्तांत केली असून त्यास विषमवृत्त म्हटलें आहे. तेव्हा ह्या दोन मतांपैकी कोणतें सयुक्तिक हें कळण्यासाठींहि प्रथम अनुष्टुभाचें स्वरूप बारकाईने पाहणें अवश्य आहे.

अनुष्टुभाच्या निरीक्षणानें असें दिसतें की त्याच्या दोन अर्धांची अदलाबदल केली तरी चाल बिघडत नाही. पण कोणत्याहि अर्धांतील दोन चरणांची अदलाबदल केली असतां चाल बिघडते. नारायणं नमस्कृत्य । नरंचैव नरोत्तमम् । याचे ऐवजी, नरंचैव नरोत्तमं । नारायणं नमस्कृत्य ॥ असें म्हटल्यास अनुष्टुभाची चाल बिघडतेच. यावरून कळतें की अनुष्टुभ् होण्यास वृत्तदर्पणांत सांगितल्याप्रमाणे 'अक्षरें चरणीं आठ' एवढीच अट पुरेशी होत नाही. अनुष्टुभांत लघुगुरूसंबंधाने कांही नियम असलेच पाहिजेत आणि ते नियम सम व विषम चरणांत निरनिराळे असले पाहिजेत, म्हणून ते चरण एकमेकांऐवजी घेतां येत नाहीत. आणि म्हणूनच अनुष्टुभाचें लक्षण एका चरणावरून न ठरतां अनुष्टुभाचे अर्धावरून ठरतें.

अनुष्टुभ् म्हणूं लागलें असतां त्याच्या प्रत्येक चरणाचे चार चार अक्षरांचे दोन स्वाभाविक विभाग पडतात असें प्रत्ययास येतें. एका चरणांतील हे विभागहि परस्परांचे ठायीं घेऊन चालत नाही. नारायणं नमस्कृत्य । नरंचैव नरोत्तमं । याचे ऐवजी नमस्कृत्य नारायणं । नरोत्तमं नरंचैव ।। असें म्हटल्यास तेंहि अनुष्टुभासारखें कानास लागत नाही. यावरून कळतें की अनुष्टुभाच्या विषम चरणाचे दोन व सम चरणाचे दोन मिळून हे जे चार विभाग पडतात त्यांतील लघुगुरूसंबंधाने नियम भिन्न असले पाहिजेत. वृत्तदर्पणांतील 'एक नेम नसे गणीं' याचा अर्थ गणनियम मुळीच नाहीत असा न समजतां सम विषम चरणांतील या चार विभागांतले गणनियम भिन्न भिन्न आहेत, ते एकच नाहीत, असा समजावयास पाहिजे. या विभागांस आपण अनुक्रमें ( १ ) विषमपूर्वार्ध, ( २ ) विषमोत्तरार्ध, ( ३ ) समपूर्वार्ध, आणि ( ४ ) समोत्तरार्ध म्हणूं. अनुष्टुभाचे अर्धांतील या चार विभागांतले गणनियम कळणें म्हणजेच अनुष्टुभाचें लक्षण कळणें होय.

म. सा. प. (२१-१-२)

हें लक्षण शोधण्यासाठी छंदोरचनाकारांनी बराच प्रयत्न केला आहे. 'पचमं लघु सर्वेषु सप्तमं द्विचतुर्थयोः हें वराहमिहिराचें आणि 'श्लोके षष्टं गुरु ज्ञेयं सर्वत्र लघु पंचमं । द्विचतुःपादयोर्ह्रस्वं सप्तमं दीर्घमन्ययोः हें श्रुतबोधांतील कालिदासाचें वचन उद्धृत करून जणू काय ह्या वचनांपलीकडे अनुष्टुभाचे लक्षणाचा शोध आजवर कोणीं केलाच नाही, अशा भूमिकेवरून छंदोरचनाकारांनी हा प्रयत्न केला असून वरील वचनांतील पंचम, षष्ठ व सप्तम तिन्ही अक्षरांसंबंधाचे नियम निरपवाद नाहीत असें दाखविलें आहे. पण यापूर्वीच पुष्कळ वर्षांमागे स्वातंत्र्यवीर सावरकर यांनी स्वतंत्रपणें अनुष्टुभाचें लक्षण शोधण्याचा असाच प्रयत्न केला असून त्यांनी 'अनुष्टुभांत कोणत्याहि चरणाचे आरंभीं मगण किंवा नगण नसतो' असा शोध लाविला असल्याचें त्यांच्या 'माझी जन्मठेप' ह्या पुस्तकात ग्रथित झालेलें आहे. छंदोरचनाकारांनी बहुधा तें पाहिलेलें नसावें; नाहीतर त्याची नोंद त्यांनी केलीच असती.

दुसरें असें की अनुष्टुभाचे लक्षणाचे शोधार्थ परीक्षणासाठी कोणत्या ग्रंथांतील श्लोक घेणें इष्ट ? छंदोरचनाकारांनी त्यासाठी गीतेचे कांहि अध्याय घेतले आहेत. गीता हा तत्त्वज्ञानाचा मान्य ग्रंथ असला तरी तो कांही अभिजात काव्यग्रंथ नव्हे. गीतेंतील रचना छंदाच्या दृष्टीने क्वचित् आर्ष म्हणजे शिथिल असण्याचा संभव आहे असा आक्षेप येण्यास येथे जागा राहते. गीतेंतील अकराव्या अध्यायाच्या पहिल्या श्लोकाचा पहिला चरण 'मदनुग्रहायपरमं' असा नऊ अक्षरी आहे. तसेंच अ० २ श्लोक ४६ 'यावानर्थ उदपाने सर्वतःसंप्लुतोदके' यांतील उदपाने हा विषमोत्तरार्ध ।ऽऽ या स्वरूपाचा म्हणजे सग गणाचा आहे पण तसा तो अनुष्टुभांत प्रायः नसतो. हीं उदाहरणें शिथिल रचनेचीं निदर्शक आहेत. छंदोरचनाकारांनी परीक्षणार्थ घेतलेल्या गीताध्यायांतहि ।ऽऽ ह्या स्वरूपाचा एक विषमोत्तरार्ध आढळल्याचें पृष्ठ १०६ वर लिहिलें आहे. पण बारकाईने पाहूनहि त्या अध्यायांत त्याचा पत्ता लागत नाही. तथापि गीतेंत क्वचित् शिथिल रचना आहेच. तेव्हा शिथिलतेच्या आक्षेपास जागा न राहावी म्हणून गीतेपेक्षा कालिदासासारख्या मान्य कवीचे काव्यग्रंथ परीक्षणास घेतले असते तर अधिक उचित झालें असतें.

परीक्षणार्थ घेतलेल्या गीताध्यायांत समचरणाचे पूर्वार्धांत प्रथमाक्षरापुढे रगण असल्याचें एकहि उदाहरण छंदोरचनाकारांस आढळलें नाही. तरीदेखील त्यांनी समचरणाची त्रिपदी म्हणून जी पृष्ठ १०७ वर दिली आहे तींत 'हो तूं मला अनुव्रता' असा एक चरण आहे. त्यांत प्रथमाक्षरापुढे **तूं मला** हा रगण आला आहे. यावरून गीताश्लोकांच्या परीक्षणाने कळलेलीं बंधनेंहि त्यांनी निश्चित मानलेलीं दिसत नाहीत.

डॉ. पटवर्धनांनी व तत्पूर्वी श्री. सावरकरांनी अनुष्टुभाच्या लक्षणाच्या शोधाकडे लक्ष पुरविलें हें विशेष होय यांत शंका नाही. पण संस्कृतांत छंदःशास्त्रावर एवढे ग्रंथ झाले असतां त्या सर्व शास्त्रकारांनी 'पंचमं लघु' आणि 'श्लोके षष्ठं गुरु' या दोनच वचनांवर समाधान मानिलेलें असतें आणि त्यापलीकडे कांहीच विचार केलेला नसता तर ती मोठीच आश्चर्याची गोष्ट मानावी लागली असती. पण वस्तुस्थिति तशी नाही त्यांनी त्यासंबंधाने पुष्कळ शोध आधीच करून ठेविला आहे. त्यांत अलीकडेच कोणीं नवीन भर घातली असें घडलेलें नाही. प्राचीन शास्त्रकारांनी सांगितलेल्या नियमांपैकीच कांही नियम श्री. सावरकर यांनी आपल्या प्रयत्नाने पुन्हा शोधून काढिले आहेत. नियम सांगण्याच्या पद्धतींत स्वभाविकपणेंच थोडा फरक झाला आहे पण एकाच मंदिराचीं भिन्न दिशांनी छायाचित्रें घ्यावीं त्यांतलाच हा प्रकार आहे. ह्या नव्या जुन्या नियमांची तुलना करून त्यांतील साम्य पाहणें मोठें कुतूहलाचें

व उद्बोधक होईल. पण त्यासाठी आधी पूर्वाचार्यांनी अनुष्टुभाचा शोध कसकसा केला आहे व कोणते नियम शोधून काढिले आहेत याचा आढावा घेणें अवश्य आहे.

पंचमं लघु सर्वेषु सप्तमं द्विचतुर्थयोः । या वराहमिहिराच्या वचनांत पांचवें अक्षर सर्वत्र लघु व सातवें सम चरणांत लघु असतें एवढेंच सांगितलें आहे. सातवें विषम चरणांत कसें असतें तें सांगितलेलें नाही. वराहमिहिराच्या ह्याच श्लोकार्धापुढे छंदोमंजरींत 'गुरु षष्ठं च पादानां शेषेष्वनियमो मतः' हें अर्ध जोडिलें आहे. ह्यांत सहावें गुरु ही भर असली तरी सातवें विषम चरणांत कसें असावें हें अनुक्त राहतेंच. श्रुतबोधकार कालिदासाने मात्र 'श्लोके षष्ठं गुरु ज्ञेयं' या श्लोकांत सातवें अक्षर विषम चरणांत गुरु असतें हें अधिक सांगितलें आहे. इतरत्र हाच श्लोक आणखी थोड्या फेरफाराने घेतलेला आढळतो. पण त्यांतहि चरणांच्या पूर्वार्धासंबंधाने कांही सांगितलेलें नाही. आणि विषमोत्तरार्धास हे दिलेले नियम निरपवादपणें लागू पडत नाहीत. समोत्तरार्धांत आठवें अक्षर पादांतींचें म्हणून गुरु हें गृहीत धरून त्यांत सातवें व पांचवें लघु व सहावें गुरु असल्याने तेवढ्यापुरतें मात्र निश्चित लक्षण कळतें म्हणजे या श्लोकांनी अनुष्टुभाच्या एक चतुर्थांशाचें मात्र लक्षण निश्चित होतें.

पण संस्कृत छंदःशास्त्रकारांनी या श्लोकांवरच न थांबतां अनुष्टुभाच्या स्वरूपाचा सखोल अभ्यास केला आहे. त्यांनी अनुष्टुम् वर्गापैकी वाङ्मयांत प्रायः येणाऱ्या म्हणून **प्रायिक** अशा प्रकारांचा एक पोटवर्ग कल्पून त्यास **वक्त्र** असें सामान्य नांव दिलें आहे. आणि गणभेदाने त्याचे जे प्रकार होतात त्यांस नांवें देऊन त्यांचीं लक्षणेंहि सांगितलीं आहेत. यासाठी **वक्त्रप्रकरण** म्हणून एक स्वतंत्र प्रकरणच पुष्कळ ग्रंथांत दिलेलें असतें. लेले ह्यांच्या मराठी साहित्यशास्त्रांतहि तें पुरवणीरूपाने दिलें आहे.

छंदोमंजरींत पुढील वचन आहे:—

प्रयोगे प्रायिकं प्राहुः केऽप्येतत् वक्त्रलक्षणम् ।
लोकेऽनुष्टुबिति ख्यातं तस्याष्टाक्षरता कृता ॥

या वचनावरून संस्कृत वाङ्मयांत प्रायः येणाऱ्या अष्टाक्षरी वृत्तास पिंगलादि छंदःशास्त्रज्ञांनी **वक्त्र** अशी संज्ञा दिली पण लोकांत ती रूढ न होतां त्यास अनुष्टुम् असेंच म्हणण्याची चाल पडली हें उघड होतें. वक्त्राच्या अनेक प्रकारांपैकी वाङ्मयांत $\frac{९}{१०}$ पेक्षा अधिक स्थळीं येणारा असा मुख्य प्रकार आहे त्यास **पथ्यावक्त्र** असें म्हणतात. याचें पिंगलसूत्रानुसार लक्षण वृत्तरत्नाकरांतील पुढील श्लोकावरून कळतें.

वक्त्रं नाद्यान्नसौ स्यातामब्धेर्योऽनुष्टुभिख्यातम् ।
युजोर्जेन सरिद्भर्तुः पथ्यावक्त्रं प्रकीर्तितम् ॥

चारी चरणांत **आद्यात्** म्हणजे प्रथमाक्षरापुढे **नसौ न स्याताम्** म्हणजे नगण किंवा सगण नसावा. विषम चरणांत **अब्धेः** म्हणजे चतुर्थाक्षरापुढे **यः** म्हणजे यगण असावा. त्यापुढील आठवें अक्षर पादान्तींचें म्हणून गुरु असावें हें सांगणें नकोच. **युजोः** म्हणजे दोन्ही समचरणांत **सरिद्भर्तुः** म्हणजे चतुर्थाक्षरापुढे **जेन** म्हणजे जगण आल्याने पथ्यावक्त्र होतें.

या लक्षणांत विषम चरणांत पांच ते सात अक्षरांचा **यगण** आणि समचरणांत त्यांचा **जगण** सांगितला असल्याने 'श्लोके षष्ठं' इत्यादि पूर्वोक्त वचनांचें सर्व सार यांत आलें असून कोणत्याहि चरणाच्या पूर्वार्धांत प्रथमाक्षरापुढे नगण वा सगण नसावा हें अधिक सांगितलें आहे. याशिवाय समचरणांत प्रथमाक्षरापुढे रगणहि नसावा अशी अधिक भर पिंगलादिकांनी घातलेली असून तिचा उल्लेख मराठी साहित्यशास्त्रांतहि केलेला आहे.

संस्कृत वाङ्मयांतील अनुष्टुभांत ९०% हून अधिक प्रमाणांत आढळणारें जें हें पथ्यावक्त्र त्याच्याच विषमोत्तरार्धांत ५ ते ७ अक्षरांत यगण असतो त्याऐवजी म, न, र, किंवा त गण आल्यास अनुक्रमें भविपुला, नविपुला, रविपुला व तविपुला हे वक्त्रप्रकार होतात. याच रीतीने ज्यांत या यगणाऐवजी मगण येतो, त्यास हेमचंद्र मविपुला म्हणतो. यांपैकी मविपुला, नविपुला आणि भविपुला यांचीं उदाहरणें वाङ्मयांत बरींच म्हणजे शेकडा दोन, तीन आढळतात. त्यांच्या मानानें रविपुलेचीं थोडीं आढळतात. तविपुलेचीं अत्यंत दुर्मीळ आहेत. छंदोग्रंथकारांनीं हा प्रकार दिला आहे तेव्हा त्यांस त्यांचीं उदाहरणें क्वचित् आढळलीं असावील. सविपुला असा प्रकार हेमचंद्रानें दिला असला तरी केदारभट्टानें वृत्तरत्नाकरांत दिला नाहीं त्यापक्षीं त्यास तसलीं उदाहरणें प्रायः आढळलीं नसतील हें उघड होतें. वरील विवेचनावरून हें स्पष्ट होतें कीं पथ्यावक्त्र आणि त्यापासूनच अल्प फरकानें झालेले भविपुलादि प्रकार म्हणजेच संस्कृत वाङ्मयांतील अनुष्टुभ् वृत्त होय.

आता सर्व वक्त्रांस म्हणजे अनुष्टुभांस साधारण म्हणून वृत्तरत्नाकरांत सांगितलेलें 'आद्यात् नसौ न स्याताम्' हें बंधन आणि श्री. सावरकर संशोधित 'चरणारंभीं नगण वा भगण नसावा' हें बंधन यांची तुलना करावयाची. अनुष्टुभ् चरणाचे पूर्वार्धांत पहिलें व चौथें अक्षर लघु व गुरु कसेंहि असलें तरी चालतें. 'मधलीं दोन्ही लघु' अशी स्थिति मात्र नसावी हेंच खरें बंधन होय. या मधल्या दोन लघूंस पुढील चौथें लघु वा गुरु अक्षर जोडल्यानें अनुक्रमें नगण वा सगण होतो. हे गण नसावे असें पिंगलानुसारें वृत्तरत्नाकर सांगतो, तर ह्याच दोन लघूंस पहिलें लघु वा गुरु अक्षर जोडल्यानें जे नगण वा भगण होतात ते नसावे, असें श्री. सावरकर सांगतात. आणि छंदोरचनाकार लघुगुरूंचीं चिन्हें योजून तीच गोष्ट दर्शवितात. पहिलें व चौथें अक्षर ही केवळ डावी उजवी पार्श्वभूमि आहे. चरणपूर्वार्धाकडे श्री. सावरकर डावीकडून पाहतात तर पिंगलादि पूर्वाचार्य उजवीकडून पाहतात म्हणून गणांचीं नांवें भिन्न येतात इतकेंच. वस्तुस्थितींत भेद नाहीं. चरणपूर्वार्धाकडे असें डावी उजवीकडून न पाहतां समोरून पाहिलें तर त्याचा मध्यभाग दोन लघूंचा बनलेला असा केव्हाहि नसतो हा मूलभूत नियम दिसून येईल आणि म्हणून अनुष्टुभ्‌चरणाचा पूर्वार्ध लघुमध्य नसतो असा नियम सांगणें अधिक समर्पक होईल.

आता वक्त्रास म्हणजे अनुष्टुभास वृत्त म्हणतां येईल कीं नाहीं या प्रश्नाकडे वळूं. वक्त्राचा चरण लघुगुरुक्रमानें कसाहि असला तरी तो अनुष्टुभ्‌वृत्ताच्या म्हणजे अष्टाक्षरी वृत्ताच्या २५६ प्रस्तारांपैकीं कोणत्यातरी प्रकाराचा असणारच. म्हणजे प्रत्येक चरण वृत्तप्रकारांतलाच असणार यांत शंका राहात नाहीं. मात्र श्लोकांतील चार चरण एकाच वृत्तप्रकाराचे नसतात म्हणून तें समवृत्त नव्हे. पण तें विषमवृत्त आहेच. विषमवृत्ताचें लक्षण असें:—

यस्य पादचतुष्केपि लक्ष्म भिन्नं परस्परम् ।
तदाहुर्विषमं वृत्तं छन्दःशास्त्रविशारदाः ॥

या लक्षणाप्रमाणे वक्त्र म्हणजे अनुष्टुभ् हें सामान्यतः विषमवृत्तच असतें तथापि तें क्वचित् अर्धसमहि असतें आणि म्हणूनच प्राकृत पिंगलसूत्राच्या टीकेंत

भवत्यर्धसमं वक्त्रं विषमं च कदाचन ।

असें सांगितलें आहे. रघुवंशांतहि अर्धसमवृत्त अनुष्टुभाचीं उदाहरणें आढळतात. पुढील श्लोक पहाः—

चतुर्वर्गफलं ज्ञानं कालावस्थाश्चतुर्युगाः ।
।ऽऽ।।ऽऽऽ ऽऽऽऽ।ऽ।ऽ
चतुर्वर्णमयो लोकः त्वत्तः सर्वे चतुर्मुखात्॥ रघु. १०-२२
असज्जनेन काकुत्स्थः प्रयुक्तमथ दूषणम् ।
।ऽ।ऽ।ऽऽऽ ।ऽ।।।ऽ।ऽ
न चक्षमे शुभाचारः सदूषणमिवात्मनः ॥ रघु. १२-४६
स पितुः पितृमान्वंशं मातुश्चानुपमद्युतिः ।
।।ऽ।।ऽऽऽ ऽऽऽ।।ऽ।ऽ
अपुनात्सवितेवोभौ मार्गावुत्तरदक्षिणौ ॥ रघु. १७-२

हीं उदाहरणें अर्धसमवृत्ताचीं आहेत. पण हीं लगक्रमाने एकमेकांहून भिन्न स्वरूपाचीं आहेत. वृत्त सम असो, अर्धसम असो वा विषम असो, त्याचीं लगक्रमाने समान स्वरूपाचीं अनेक उदाहरणें दृष्टीसमोर आलीं तरच त्यांचा एक समूह कल्पून त्यांस कांही वृत्तनाम देण्यांत येतें. वृत्तांचीं सर्व नांवें अशींच पडलीं आहेत. वरील अर्धसमवृत्तें भिन्न लगक्रमाचीं असल्याने त्यांस ( वियोगिनी, वेगवती यासारखें ) एखादें वृत्तनाम देतां येणार नाही. त्यांस अर्धसमवृत्त हें सामान्य नांवच राहणार. आता कुमारसंभवांतील पुढील दोन उदाहरणें पहाः—

यज्वभिः संभृतं हव्यं । विततेष्वध्वरेषु सः ।
ऽ।ऽऽ।ऽऽऽ ।।ऽऽ।ऽ।ऽ
जातवेदो मुखान्मायी । मिषतामाच्छिनत्ति नः ॥ कु. सं. २-४६
सत्यमर्काच्चसोमाच्च । परमध्यास्महे पदम् ।
ऽ।ऽऽ।ऽऽऽ ।।ऽऽ।ऽ।ऽ
अद्य तूच्चैस्तरं ताभ्यां । स्मरणानुग्रहात्तव ॥ कु. सं. ६-१८

हीं उदाहरणें लगक्रमाने समान स्वरूपाचीं आहेत. पण तीं परस्परांपासून इतकीं दूर आलीं आहेत की तीं एकाच स्वरूपाचीं आहेत हें सहज ध्यानीं येण्याजोगें नाही. अपार संस्कृत वाङ्मयांत समान लगक्रमाचे अर्धसम किंवा विषम अनुष्टुम् श्लोक हुडकावयाचेच म्हटलें तर प्रत्येक लगक्रमाचे कित्येक सांपडतील. पण ते सहज ध्यानीं येण्याजोगे नाहीत म्हणूनच त्यांस स्वतंत्र वृत्तनामें मिळालीं नाहीत. आणि म्हणून त्यांची गणना छंदःशास्त्राप्रमाणे अर्धसमवृत्त किंवा विषमवृत्त अशा सामान्य नांवानेच करावी लागते. वरील विवेचनावरून अनुष्टुम् हें वृत्त आहे ह्याविषयीं संशय रहाणार नाही.

आता शेवटीं कालिदासाच्या काव्यांत अनुष्टुभाचें सामान्य स्वरूप कसें आढळतें तें पाहूं. कालिदासाच्या रघुवंशांत सर्ग १, ४, १०, १२, १५, व १७ मिळून अनुष्टुम् ५४८ आहेत. कुमारसंभव सर्ग २, ६, १० व १६ मिळून २६५ आणि शाकुंतल व विक्रमोर्वशीय यांत अनुक्रमें २८ व २९ आहेत. या सर्वांमिळून ८७० श्लोक म्हणजे १७४० श्लोकार्धं होतात. यांत रविपुलेचीं अवघीं दोन उदाहरणें कु. सं. ६–७३ व १६–२२ मध्ये सांपडतात. म्हणजे ह्यांचें प्रमाण १७४० त २ इतकें अत्यल्प पडतें. श्लोक म्हणतांना रविपुलेंतील या रगणावर थोडा गचका बसतोंच. वृत्तदर्पणांतील

लघूची तो एक मात्रा । गुरूच्या दोन मानिती ।
मात्रावृत्तीं ह्याच रीती । मात्रांनी गण मोजिती ॥

यांतील दोन्ही अर्धें रविपुलेचीं आहेत. यांत थोडा फरक करून,

लघूची तीं कला एका। गुरूच्या दोन मानिती।
मात्रावृत्तीं अशा रीती। मात्रांनी गण मोजिती॥

असा श्लोक म्हणून पाहावा. म्हणजे मूळच्या श्लोकांत गचका कसा बसतो व या दुसऱ्यांत वाक्प्रवाह कसा संथ वाहतो हें प्रत्ययास येईल. कालिदासाने रविपुला अत्यल्प प्रमाणांत योजिली याचें कारण तरी हेंच दिसतें. गीतेंत रविपुलेचें प्रमाण यापेक्षा बरेंच अधिक– सुमारें शेकडा दोन इतकें पडतें.

रविपुलेचीं हीं दोन उदाहरणें वगळलीं तर कालिदासाच्या या चार ग्रंथांतले बाकीचे सर्व म्हणजे १७३८ श्लोकार्धं पथ्यावक्त्र, मविपुला, भविपुला व नविपुला यांचेच आहेत. यांपैकी पथ्यावक्त्र व मविपुला यांत विषमोत्तराचा मध्यभाग दोन गुरु अक्षरांचा असतो तर भविपुला व नविपुला यांत तो दोन लघु अक्षरांचा असतो. दोन गुरूंचा असो वा दोन लघूंचा असो; या चारी प्रकारांत विषमोत्तराचा मध्यभाग समस्वरूपाचाच असतो, एक लघु व एक गुरु अशा विषमस्वरूपाचा नसतो, हें निश्चित होय. हेंच थोडक्यांत 'विषमोत्तरार्धं सममध्य असतो' असें या पथ्यावक्त्रादि चार प्रकारांसंबंधाने म्हणतां येईल. रविपुलेंत मात्र तो रग गणाचा असतो. बाकीचीं बंधनें वक्त्राच्या ह्या पांची प्रकारांस समानच आहेत. तीं म्हणजे (१) कोणत्याहि चरणाचा पूर्वार्धं लघुमध्य नसतो. (२) समपूर्वार्धाचे अंतीं रगण नसतो म्हणजे समपूर्वार्धं रान्त ही नसतो आणि (३) समोत्तरार्धं नित्य । ऽ । ऽ या स्वरूपाचा म्हणजे जग गणाचाच असतो. हीं बंधनें मागे पथ्यावक्त्राचे लक्षणांत सांगितलेलींच आहेत. ह्या सर्वांच्या एकीकरणाने कालिदासाच्या श्लोकाचें म्हणजेच अनुष्टुभाचें लक्षण होतें तें असें:—

लघुमध्य न पूर्वार्धं श्लोकीं; रान्त न तो समीं।
समान्ती जग ये; अन्यीं सममध्य, रगा क्वचित्॥

गणपरिभाषेंत हेंच लक्षण संस्कृतांत पुढीलप्रमाणे होईल:—

श्लोके नाद्यान्नसावोजे। नचाद्यात्सनराःसमे।
ओजे तुर्यान्न तजसाः। समे तुर्याजगौ ध्रुवम्॥

आद्यात्=प्रथमाक्षरापुढे. नसौ=नगण वा सगण. ओजे=विषम चरणांत. सनराः=सगण, नगण किंवा रगण. तुर्यात्=चतुर्थाक्षरापुढे. तजसाः=तगण, जगण किंवा सगण. जगौ=जगण व गुरु. याचेंच मराठी रूपान्तर असें होईलः—

श्लोकीं आद्यापुढे नासा। नसे; राही समीं नसे।
तुर्यापुढे न तजसा। ओजीं; जग समीं वसे॥

**अर्थः**—अनुष्टुभांत चरणाच्या प्रथमाक्षरापुढे नगण किंवा सगण नसतो. समचरणांत त्या प्रथमाक्षरापुढे न व स गणांप्रमाणेच रगणहि नसतो. विषम चरणांत चतुर्थाक्षरापुढे त, ज किंवा सगण येत नाही आणि सम चरणांत चतुर्थाक्षरापुढे जग म्हणजे जगण व गुरु नित्य येतात.

एवंच, (१) संस्कृत वाङ्मयांत वैपुल्याने येणारें अनुष्टुम् हें वृत्त आहे. (२) तें क्वचित् अर्धसम पण प्रायः विषमवृत्त असतें. (३) त्याच्या चारी चरणांत विशिष्ट लगत्वबंधनें असतात. आणि (४) तीं सर्व बंधनें पिंगलादि प्राचीन शास्त्रकारांनीच वक्त्र हें एक स्वतंत्र प्रकरण करून सांगितलीं आहेत.

---

# अणुगर्भीय परिभाषा :

लें० प्रा. सखाराम विनायक आपटे

१. Alpha particle अ अल्पक. औम्रातु किंवा रदातु यांच्यासारखीं जीं रादनिकें द्रव्यें आहेत त्यांच्या अणुगर्भांतून तीन प्रकारचे अल्पक बाहेर निघत असतात. त्यांना अ ब ग अल्पक म्हणतात. यांपैकी अ अल्पक धनोच्चयी असून हेलातुंचा अणुगर्भ आणि अ अल्पक हे एकच होत असें आता निश्चित झालेलें आहे. हेलातूच्या अणुगर्भाला ( अथवा अ अल्पकाला ) हेलुक ही संज्ञा आहे. एका हेलुकामध्ये (अथवा अ अल्पकामध्ये) दोन धानक आणि दोन वस्तुक अशी सामग्री असत्ये. ब अल्पक म्हणेज वीजकच होत; आणि ग अल्पक म्हणजे गामुक तरंग अथवा काशुक होत. Beta particle, Gamma ray पहा. यांचा निर्देश $\alpha$ $\beta$ $\gamma$ अ शर, ब शर आणि ग शर असा करणें उपयुक्त आणि सोईचें ठरेल. कारण ही तीनहि प्रकारची फेक मोठी शरासारखी भिदुर आणि शक्तिमत् असत्ये. या तिन्ही अल्पकांचा समुच्चयाने उल्लेख करणें असल्यास त्रिशरी असा करतां येईल. या त्रिशरीचा उल्लेख हे बी गा असाहि करतां येईल.

२. Atom अणु. रासायनिक दृष्ट्या कोणतेंहि एखादें द्रव्य घेतल्यास तें मिश्र असेल किंवा अमिश्र असेल. अमिश्र असेल तरी तें एखादें संयुग तरी असेल किंवा मौल[2] (मौल द्रव्य) तरी असेल. संयुगाचे सूक्ष्म म्हणजे रेणु[3] ( मॉलिक्यूल ) आणि मौलाचें सूक्ष्म म्हणजे अणु[3].

आधुनिक अणुघटितः—अणुगर्भ हा अणूच्या मध्यमार्गी, त्यानंतर पुष्कळ मोकळें अन्तर, जणू सूर्य आणि ग्रह यांच्यांतील अन्तरासारखें सापेक्षतेने. त्यानंतर अणुपरिसर. या अणुपरिसरांत एक किंवा अनेक कक्षा आणि आपापल्या कक्षेंत घिरट्या घालीत असलेले वीजक. असें हें ठोकळ मानाने पाहतां आधुनिक अणुघटित आहे (atomic structure model). यांतील अणुगर्भामध्ये धानक आणि वस्तुक अशी द्विविध सामग्री असून, जितके धानक अणुगर्भांत तितकेच वीजक अणुपरिसरांत असें असतें. धानकाचा वीजोच्चय एक आणि घन; वीजकाचा वीजोच्चय एकच पण ऋणः असें असल्यामुळे अणुगर्भ आणि अणुपरिसर यांमधील पोकळींत वैजिक क्षेत्र असून धनोच्चय आणि ऋणोच्चय हे समतोल राहतात; व एकंदर अणु अनुच्चयी होतो. अणुगर्भाभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या वीजकांना भ्रमद्वीजक अथवा भ्रमरवीजक म्हणतात. एखाद्या बाह्य भ्रमणकक्षेंतून जेव्हा एखादा भ्रमरवीजक त्यापेक्षा आंतील भ्रमणकक्षेंत उडी घेतो तेव्हा एक तेजस्त्रुटि बाहेर पडत्ये, ती प्रकाशरूपाने light quantum.

---

१ निसर्गतः ( आपोआपच ) अणुगर्भ फुटून त्याचा ऱ्हास होत जाणें ही क्रिया म्हणजे रदक्रिया रदक्रियाशील द्रव्यांना रादनिक द्रव्यें म्हणावयाचें (रद भेदे).

२ मौल म्ह० 'मूले भव.' अर्थात् संयुगाच्या दृष्टीने पाहिल्यास मुळांत असलेलें. दुसऱ्या बाजूने, म्ह० धानक, वस्तुक, आणि वीजक हें जें त्रिविष्टक, तिकडून पाहिलें असतां मौल याचा अर्थ 'मूलादागत'. त्रिविष्टक म्ह० मुळांतील तीन प्रकारचे घटक.

३ अणु=लहान. रेणु हा शब्द रीचलनार्थी धातु यापासून आलेला आहे. अल्पत्वाचा क्रम कण, रेणु आणि अणु असा. अणुरेणु म्हणजे अणूंचा एक गट करून बनलेली वावरणारी, अर्थात् अणूपेक्षा मोठी चळवळी व्यक्ति. अणुरेणु हा ' अणु आणि रेणु ' असा द्वन्द्व समासहि होईल. ' रेणुसार ' हें कापराला नांव आहे हें विचार करण्यासारखें आहे. रेणूचें प्रधान लक्षण चळवळ हेंच; आणि तेंच ठसविण्याकरिता चलद्रेणु, त्रसरेणु असें म्हणावयाचें—द्विरुक्ति वाटली तरी. चलद्रेणु कल्पना Kinetic molecular theory.

३. Atomic bomb अणुध्वम्. अणुध्वंविषयी सर्व तपशील प्रकट झालेला नाही; तो युद्धार्थीय म्हणून गुप्त आहे. तथापि कांही कांही लक्षणीय गोष्टी प्रकट झालेल्या आहेत. अणुध्वंला स्फोटकपणा आणि ध्वंसकपणा येण्याला निदान पक्षीं कमींत कमी अमुक एक आकार म्हणून लागत असतो. अर्थात् असें आहे की औस्रातु हें स्फोटक द्रव्य खरें, पण तें कण दोन कण किंवा चिमटीभर घेतलें असतां, म्ह० सीमान्तिक[1] मानापेक्षा कमी घेतलें असतां, स्फोट उत्पन्न करूं शकत नाही.

कारण त्यांतून भरकन् इतके वस्तुक बाहेर सहज निघून जातात की सानुबंधक्रिया, जी स्फोटाला आवश्यक असत्ये ती, मुळींच घडून येत नाही. अणुध्वं भडकविण्यापूर्वी त्यांतील स्फोटक द्रव्य अलग अलग दोन किंवा तीन भागांत ठेविलेलें असतें; एकेक भाग सीमान्तिक मानापेक्षा लहान असल्याने निरुपद्रवी असतो. भडकविण्याच्या वेळीं हे दोन किंवा तीन भाग अत्यंत त्वरेने एकत्र भिडवून दिले जातात. एकंदर भीड-आकार (मिलिताकार) सीमान्तिक आकारापेक्षा मोठा असल्यामुळे तत्क्षणींच भयंकर स्फोट होतो. भडकवितांक्षणींच पहिल्या दोन-चार विपळप्रयुतांशांतच[2] इतकें मोठें तेज बाहेर पडतें की स्फोटक सामग्रीचें तपमान कित्येक प्रयुत क्रामिकेवर चढतें ! औस्रातूची वाफर होऊन जात्ये; त्याचा अगदी पूर्णपणें धुव्वा उडतो; कितीतरी प्रयुत वातांबरांइतकें प्रेरण[3] वाढतें आणि विस्फार[4] प्रचंड होऊं लागतो. तत्क्षणींच अर्थात् सर्व सामग्री विस्खळित होऊन वस्तुक[5] बाहेर लुचून उडून जातात आणि सानुबन्धक्रिया थांबत्ये. साहाजिकच, सर्वच्या सर्वच औस्रातु कामीं लागण्यापूर्वींच ही विखराविखरी होऊन जात्ये.

४. Atomic number अणुक्र. क्रमांक याचें संक्षिप्त रूप क्र एवढेंच पुरें आहे. या क्र वरून विवक्षित अणुगर्भामध्ये एकंदर धानक किती हे कळतें; अर्थात् अणूच्या साम्यावस्थेंत (म्ह० अनुच्चय[6] अवस्थेंत) जितके अणुगर्भांत धानक[7] तितकेच अणुपरिसरांत वीजक[8] असावयाचे असा नियमच असल्यामुळे विवक्षित अणु क्र वरून त्याच्या परिसरांत वीजक किती असतात तें बरोबर कळतें. प्रत्येक रासायनिक मौलाला त्याचा त्याचा आपापला ठराविक क्र असतो; जणू काय त्याची निशाणीच किंवा ओळखण्याची खूणच ती.

कोणत्याहि विवक्षित मौलाच्या कोणत्याहि अणूला क्र अगदी ठराविक तोच असावयाचा; कारण त्या त्या मौलाचें रासायनिक आचरण (संयोग-वियोग संबंधीचें) त्याच्या त्याच्या वीजक संख्येवरूनच ठरत असतें. क्र हा परिसरांतील वीजकसंख्या सांगणारा अंकच

१ सीमा म्ह० मर्यादा. सीमान्त म्ह० मर्यादेचें मान. यापेक्षा पलीकडे आकारमान असल्यास स्फोटाची शक्यता, यापेक्षा अलीकडे आकारमान असल्यास स्फोटाची शक्यता नाही. Critical size सीमान्तिक आकारमान.

२ प्रयुत = दशलक्ष; $१०^{६}$ 'दशघन सहा' असें हें वाचावें. $१०^{-६}$ असें असल्यास दशऋण सहा असें वाचावें. प्रप्रयुत = $१०^{१२}$ दशघन बारा. प्रप्रप्रयुत = $१०^{१८}$ दशघन अठरा अर्थात् दहा परार्ध. परार्ध = $१०^{१७}$. अब्ज = $१०^{९}$, कोटि = $१०^{७}$, सहस्र = $१०^{३}$, अयुत = $१०^{४}$ इत्यादि लक्षांत ठेवणें.

३ प्रेरण = प्रेशर वातांबर = Atmosphere. ४ Expansion.

५ Neutron. neutron chain reaction. हे शब्द पुढे पाहा.

६ उच्चय = वीजोच्चय Electric charge. ७ Protons. ८ Electrons.

आहे. पण यावरून कदाचित् कोणी असें समजेल की विवक्षित मौलाच्या सर्व अणूंचा भार अगदी सारखाच असावा, तर तें मात्र खरें नव्हे.

[isotopes, atomic weight & nucleus तत्रस्थ, अणुभार, आणि अणुगर्भ पाहा.]

५. Atomic weight, अणुभार. आणवीय भार[1] दाखविण्याकरिता जो अंक वापरतात तो. निरनिराळ्या अणूंचे भार सापेक्षपणें दाखविण्याकरिता कांहीतरी एक श्रेणी पाहिजेच. याकरिता ऊर्वाणु हा उपमान कल्पून त्याच्या अणूचा भार संकेततः १६ धरिलेला आहे आणि तदनुसार इतर अणूंच्या भाराचे जे अंक येतात (अपूर्णांक सोडून) त्यांची एक श्रेणी बनत्ये; तीच वास्तवशास्त्रांतील अणुभारश्रेणी होय. ही अर्थात् ठोकळ मानाची झाली. तीच अपूर्णांक न सोडतां घेतली तर सूक्ष्म मानाने अणुभारश्रेणी मिळत्ये. यांत पुढे आणखी एक मानगड आहे ती अशा कारणाने की ऊर्वातु आणि त्याचा अणु उपमानभूत मानला तरी ऊर्वाणु सर्वच एका ठराविक भाराचे कोठे आहेत ? ऊर्वातूचे तत्रस्थ[2] तीन असून त्यांचे अणुभार १६, १७, १८ या प्रमाणांत आहेत. म्हणून मग, वास्तव श्रेणीकरिता त्यांतील जो तत्रस्थ प्रभूत आहे (म्ह० '१६' वाला) त्यालाच नक्की उपमान म्हणून धरितात आणि वास्तव श्रेणी बनवितात. [रसायनांत मात्र ऊर्वातूच्या सर्व तत्रस्थांचें 'लोकसंख्या'- प्रमाण आहे तसेंच तें लक्ष्यांत घेऊन मध्यममानाने (सरासरीने) जें अणुभाराचें मान येतें तें बरोबर १६ धरतात आणि रासायनिक अणुभारांची श्रेणी बनवितात. त्यामुळे ती थोडी निराळी येत्ये ही गोष्ट विसरतां कामा नये. ]

ठोकळ मानाच्या वास्तवश्रेणीमध्ये उज्जातूचा अणुभार एक; गुरूज्जाचा अणुभार दोन; हेलातूचा अणुभार चार; पुढें लाघवातूमध्ये दोन प्रकार आहेत, तेव्हा एकाचा अणुभार सहा व दुसऱ्याचा सात इत्यादि अशी ही व्यवस्था आहे. या व्यवस्थेत अणुभारवाचक म्हणून जो पूर्णांक दिला जातो त्यावरून त्या त्या मौलाणूच्या अणुगर्भात धानक आणि वस्तुक मिळून एकंदर विष्टक[3] किती हेहि बरोबर कळतें. उदाहरणार्थ, हेलातूच्या अणुगर्भातील एकंदर विष्टक[4] संख्या चार आहे. वास्तवश्रेणीमध्ये सुद्धा (विवक्षित मौलाच्या विवक्षित तत्रस्थाचा) सूक्ष्म अणुभार आणि स्थूल अणुभार यांत जो फरक असतो त्याचें कारण 'अद्वैतं वस्तुतेजसोः' या नियमांत आहे. म्हणजे असें की विवक्षित वस्तुकांचा आणि धानकांचा समवाय घडून येत असतांना कांही वस्तु तेजोरूपाने परिभावित होत असतें, त्यामुळे हें अन्तर पडतें.

१ वास्तविक येथे 'वस्तुता' म्हटलेलें उत्तम; पण भार म्हटलें तरीहि चालेल. भार म्ह० वस्तुताच आणि वजन म्ह० मात्र भाराच्या प्रमाणांत असणारी पृथ्वीची ओढ एवढा फरक अवश्य लक्ष्यांत ठेवला म्हणजे झालें. २ Isotopes.

३ विष्टक = वीट लाक्षणिक अर्थाने. या एका विष्टकाचें वस्तुमान एक लव ( unit of mass ). असा संकेत आहे.

४ विष्टक म्ह० आंत असलेले घटक. अणूच्या घटनेंत एकंदर तीन प्रकारचे घटक—वीजक, धानक आणि वस्तुक; तसेंच अणुगर्भाच्या घटनेंत विष्टक दोन प्रकारचे धानक आणि वस्तुक. अणुगर्भ हें बांधकाम—लाक्षणिक दृष्ट्या वर्णन करावयाचें तर—दोन प्रकारच्या विटांचें असतें. वस्तुक ही एक प्रकारची वीट आणि धानक ही एक प्रकारची वीट; अशा दोन प्रकारच्याच विटा विधात्याने अणुगर्भाच्या रचनेंत वापरलेल्या आहेत.

६. Beta particle व अल्पक. कांही रादनिक[१] द्रव्यांच्या अणुगर्भांतून बाहेर पडणारा ऋणोच्चयी अल्पक. याला वस्तुता[२] मुळींच नसल्ये म्हटलें तरी चालेल–म्ह०ती इतकी अल्प असते की लक्ष्यांत न घेतली तरी हरकत नाही, फक्त एकमात्र उच्चय[३] या अल्पकाला असतो आणि तो ऋणोच्चय होय. ऋणविजेचें हे तन्मात्र अथवा अल्पिष्ठच म्हणाना. अर्थात् वीजक या संज्ञेने हि या व अल्पकाचा निर्देश व्हावयास हरकत नाही; मात्र असें दिसतें की व अल्पक हा अत्यन्त वेगस्वी वीजक असतो, इतका की एका वीजकाला किंयेक प्रयुत इतके ऊर्ज[४] लावून जर खेचलें तर त्याला जो वेग चढेल तितक्या बेताचा वेग व अल्पकाला मिळालेला असतो. रदक्रियेमध्ये व अल्पक निघतो तो रादनिक द्रव्याच्या अणुगर्भांतूनच निघतो यांत शंका नाही; परंतु या निष्क्रमणापूर्वी वीजक म्हणून त्याचें अस्तित्व अणुगर्भांत असत नाही. अणुगर्भाच्या कांही वस्त्वंशाचें तेजांत परिभावन होऊन आयत्यावेळीं हा व अल्पक बनून बाहेर पडतो असें मानितात. [रदक्रियेंतील व अल्पकाचें अणुगर्भांतून बाहेर निघणें ही क्रिया विज्ञांना देखील अजून तितकीशी चांगली आकलन झालेली नाही हें कबूल केलें पाहिजे.]

७. Capture प्रघास. अणुगर्भाशीं वस्तुकाची गांठ पडून त्याने त्या वस्तुकाला गिळूनच टाकणें या अर्थानें या शब्दाचा विशेष उपयोग होतो. या प्रघास क्रियेनंतर अणुगर्भाची कदाचित् द्वेधा क्रिया घडून येईल किंवा कदाचित् तो वस्तुक अणुगर्भांत गडप होऊन राहील किंवा नुसताच त्याला चिकटून बसेल आणि द्वेधा क्रिया घडून येणार नाही. उदाहरणार्थ, उज्जातूच्या अणुगर्भानें एखाद्या वस्तुकाचा प्रघास केला म्हणजे तत्क्षणीं गामुक[५] किरण बाहेर पडतो आणि वस्तुक अणुगर्भांत शिरलेला तसाच राहून त्यामुळे गुरूज्जाचा अणुगर्भ स्थायी बनून राहतो. या नवीन गुरूज्ज -अणुगर्भाला 'उद्वेक' म्हणतात —'द्वि' म्ह० दोन ही त्याची वस्तुता आणि 'एक' म्ह० त्यांत असलेला धानक एक असें असून येथील 'उ' हे अक्षर उज्जाचें दर्शक आहे. हा गुरूज्ज कां तर, त्यांतील एका धानकाच्या जोडीला एक वस्तुकहि आहे. नुसत्या उज्जाच्या अणुगर्भांत केवळ एक धानकच तेवढा असतो. प्रघासाचें दुसरें उदाहरण घेऊं. औस्र २३५ या अणुगर्भानें एखाद्या वस्तुकाचा प्रघास केल्यास– मग तो वस्तुक शीघ्र असो, मंद असो– लगेच त्या अणुगर्भाची द्वेधा होल्ये म्ह० त्याचीं जवळ जवळ सारखीं दोन शकलें होतात. औ २३८ हा जो अणुगर्भ असतो त्याचें वस्तुकांशीं वर्तन जरा निराळेंच असतें; ज्याचा प्रघास होतो तो वस्तुक अतिशीघ्र असेल म्हणजे त्याची शक्ति १ प्रोर्जवी किंवा तदधिक असेल, तरच मात्र त्या अणुगर्भाची द्वेधा होल्ये. नाही तर म्ह० तो वस्तुक जर तितका वेगस्वी नसेल तर, तो अणुगर्भांत गडप होऊन जातो आणि औ २३९ हा नवीनच अणुगर्भ तयार होतो. हा नवा अणुगर्भ स्वभावतः रादनिक असून रदक्रियेच्या द्वारा याचा सुबेरातु बनतो, आणि त्यांतूनहि पुढे पुनः त्याचा कुबेरातु बनतो अशी ही मौज आहे !

८. Chain reaction सानुबन्धक्रिया. एखादी रासायनिक क्रिया किंवा अणुगर्भीय क्रिया (अणुक्रिया) जर अशी असली की तिच्यांतून जीं निष्पन्नें निघतात त्यांतील एखादें तीच क्रिया पुढे चालविण्यास उपयोगी पडतें तर अशा त्या क्रियेला सानुबन्ध क्रिया ही संज्ञा आहे. विशेष उदाहरण घ्यावयाचें झालें तर अणुध्वंचें घेतां येईल किंवा [६]पुञ्जराशिकाचेंहि घेतां

१ Radioactive. २ Mass. ३ Charge. ४ Voltage.
५ Gamma ray ग शर. ६ Pile, chain-reacting pile, uranium pile.

येईल. परंतु त्यांच्या आधी ज्वलनक्रियेचें सोपें उदाहरण पाहावें. यांत असें स्पष्ट दिसून येतें की ज्वलनक्रियेला प्रारंभणार्थ उष्णता लागते, आणि ज्वलनक्रियेंतून खूप उष्णता निष्पन्नहि होत्ये. निष्पन्न उष्णतेचा अंशतः उपयोग तीच क्रिया पुढे चालू टेवण्याकडे साहजिकच होतो. तेव्हा ही सानुबन्ध क्रिया असते. आता औस्नातूची द्वैधा, जिच्यावर अणुध्वं आणि पुञ्जराशिक या गोष्टी अवलंबून आहेत ती क्रिया कशी आहे तें पाहा. औस्नाच्या अणूने एखाद्या वस्तुकाचा प्रग्रास करणें हें द्वैधा क्रियेचें कारण, आणि द्वैधा क्रिया घडून आली की तिच्यापासून, म्हणजे औस्नाणूपासूनच, अनेक वस्तुकांची निष्पत्ति होत्ये ! अर्थात् हेच वस्तुक– सर्वच्या सर्वच नाही तरी त्यांतील कांही– द्वैधा क्रियाच पुढे पुढे चालवूं शकतात. (द्वैधा क्रियेंत उष्मोत्पत्तीहि होत्ये खरी परंतु ही उष्मोत्पत्ति द्वैधा-क्रिया पुढे चालविण्यास असमर्थ असत्ये.)

सानुबन्ध अणुक्रिया अणुध्वं आणि पुञ्जराशिक या दोहोंमध्ये मुद्दाम घडवावी लागत्ये, पण तेथे सुद्धा निष्पन्न झालेला प्रत्येक वस्तुक अणुक्रिया घडवून आणतोच असें नाही. तसें सर्वथैव इष्टहि नसतें. फक्त अणुध्वंमध्येच म्हटलें तर असें असतें की, साधल्यास, प्रत्येक निष्पन्न वस्तुकाने द्वैधा क्रिया घडवून आणावी. पण हें इतक्या पूर्णतेने अणुध्वंमध्ये सुद्धा साधत नाही. अगदी प्रकृष्ट म्हणून बनविलेल्या अणुध्वंमध्ये देखील कित्येक वस्तुक पृष्ठभागामधून बाहेर निसटून फुकट जातात, आणि त्यामुळे १०० टक्के [१]तत्परतेची सानुबन्धक्रिया साधत नाही. तसेंच पुञ्जराशिकामध्ये जें होतें तें असें की कित्येक निष्पन्न वस्तुक तत्परकीय [२] द्रव्यांमध्ये, आणि बुद्ध्या पुञ्जराशिकेच्या नियंत्रणाकरता म्हणून वापरलेल्या धातवीय अडसरांमध्ये गडप केले जाऊन द्वैधा क्रियेला मुळीच उपयोगी पडत नाहीत.

खरोखरी अणुध्वंमध्ये किंवा पुञ्जराशिकेमध्ये सानुबन्ध क्रिया साधत्ये तिला मूलाधार हा आहे की ती क्रिया साधण्याला आवश्यक त्यापेक्षा अधिक वस्तुक एकंदरींत निष्पन्न होऊं शकतात. ही गोष्ट एका बाजूला आणि दुसरी गोष्ट दुसऱ्या बाजूला अशी आहे की व्यवहारांत निदान इतकें तरी करण्याचें साधतें की प्रत्येक द्वैधा क्रियेपासून निष्पन्न झालेल्या अनेक वस्तुकांपैकी एकाला तरी (सरासरी मानाने पाहतां) पुढची एक द्वैधा-क्रिया घडवून आणण्याची संधि मिळते.

९. Cross section [३]प्रच्छेद. अणुगर्भीयामध्ये शर-शरव्य भाव विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखा आहे. हेलुक, उद्रेक यांसारखे मोठे वेगस्वी[४] अल्पक यांना शर मानणें किंवा अस्त्र मानणें योग्य होय. हीं अस्त्रें किंवा हे शर ज्या निशाणावर (म्ह० उदाहरणार्थ एखाद्या विशिष्ट

---

१ Efficiency. २ Foreign, impurity.

३ साधारणतः cross section याला योग्य शब्द अवच्छेद असा आहे: उदाहरणार्थ, " एखाद्या लाकडाचा ओंडा पाहिला आणि त्याचा अवच्छेद तपासला तर त्यांत आपल्याला चक्रें वक्रें दिसून येतात." परंतु अणुगर्भीयांत कोणता अर्थ अभिप्रेत आहे हें पुढे येणाऱ्या स्पष्टीकरणावरून दिसून येईलच. तें स्पष्टीकरण लक्ष्यांत घेतलें असतां दिसेल की "एकंदर विवक्षित अवच्छेदांतील जो उपयुक्त, शरव्य म्हणून उपयुक्त, अंश " तो वक्तव्य आहे; म्हणून प्रच्छेद असा निराळाच शब्द या प्रकरणीं असणें सोयीचें आणि सयुक्तिक आहे. " एकंदर अवच्छेदांतला जो प्रकृष्ट म्हणजे उपयोगी पडेल असा अंश तो प्रच्छेद." प्र म्हणजे प्रकृष्ट अ० प्रयोज्य असा जो छेद तो प्रच्छेद.

४ वेगः एव स्वं वेगस्वं, त्याला इन् प्रत्यय लावून वेगस्वी. वेगस्वी म्हणजे अत्यंत वेगवान्, अत्यंत मोठा वेग (किंवा तदनुरूप शक्ति) हेंच ज्याचें विशेष लक्षण तो वेगस्वी.

मोलाच्या पत्यावर) मारावयाचे असतील त्यांतील खरोखरीचे शरव्य म्हणजे अणुगर्भच होत. एक अणुगर्भ आणि दुसरा अणुगर्भ यामध्ये फार मोठा अवकाश केवळ रिकामाच असतो असें आधुनिक अणुघटित[१] कल्पनेवरून आपणांस दिसतें. म्हणून एखाद्या निशाण म्हणून धरलेल्या क्षेत्रामध्ये (उदा० एक चौरस[२] यात्रामध्ये) खुद्द अणुगर्भांनीच व्यापलेला जो भाग तोच खरा शरव्य भाग आणि त्यासच प्रच्छेद म्हणून म्हणावयाचें. समजा की कांही एका विवक्षित वेगाचे वस्तुक एका औस्त्रातूच्या ठोकळ्यांतून संचार करीत आहेत. 'यांतील कितींचा प्रघात होऊं शकेल' या प्रश्नाचें उत्तर दोन गोष्टींवर अवलंबून राहणार— एक तर औस्त्रातूच्या ठोकळ्यांतील प्रत्येक घनफळांत औस्त्राणु किती आहेत ही गोष्ट आणि तदनंतर औस्त्राणूचा प्रघातीय प्रच्छेद किती ही दुसरी गोष्ट.

१०. Cyclotron चक्रायण. अलीकडे हें एक अणुगर्भीय समन्वेपाचें मोठें बलवत्तर साधन होऊन राहिलेलें आहे. १९३० सालीं कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीचे लॉरेन्स यांनी हें साधन प्रसर्गित केलें. यांच्या योगाने अणुगर्भीयांत धानक, उद्रेक इत्यादि जीं मोठीं वेगस्वी अस्त्रें वापरावीं लागतात त्यांच्या सरीच्या सरी सोडतां येतात. या दृष्टीने पाहतां चक्रायण हें एक महाकार्मुकच आहे. याचें स्वरूप असें असतें : यांत एक मोठा थोरला [३]वैजिककर्पुक वापरलेला असून त्याच्या मुखामध्ये एक रिक्त कोठडी असत्ये. या कोठडीच्या मध्यमार्गी एक वैचिक अर्चि[४] असत्ये जिच्यापासून धानक किंवा उद्रेक यांचा उगम होतो. त्या कोठडीमध्येच आणि त्या मध्यवर्ती अर्चीच्या दोन्ही बाजूंना दोन अर्धगोल चपटे डबे बसविलेले असतात (डी च्या आकृतीचे). या दोन डब्यांमध्ये [५]महाक्षिप्रतेचें मोठें [६]ऊर्ज लाविलेलें असतें. त्या यातायातिक[७] ऊर्जामुळे धानक किंवा उद्रेक सटकन् ओढले जातात, मग ते त्या डब्यांतील कर्पुकीय क्षेत्रामुळे एक अर्धवर्तुळ गिरकी मारतात. तोंच ऊर्जाची दिशा पालटून त्यांना पुनः एक हिसका बसतो. त्यासरशी ते समोरच्या दुसऱ्या डीमध्ये प्रवेश करतात आणि त्यांतील कर्पुकीय क्षेत्रामुळे पुनः आणखी एक अर्धगिरकी मारतात; तों पुनः ऊर्जाची दिशापालट होऊन त्यांना हिसका बसतो. याप्रमाणे गिरक्या मारतां मारतां ते अल्पक या चक्रायणाच्या द्वारापाशीं येतात तेव्हा त्यांना अत्यंत वेग चढलेला असतो. धनुष्यांतून जसा एखादा बाण, किंबहुना एखादी बाणावली सुटावी, त्याप्रमाणे या वेगस्वी अल्पकांची शरवृष्टिच त्या चक्रायणद्वारा होत्ये. बाहेर पडण्याच्या वेळीं त्या एकेका अल्पकाला कित्येक प्रोर्जवीइतकी शक्ति प्राप्त झालेली असत्ये. या महाशक्ति अल्पकांचा मारा अणुपरिभावन[८] घडवून आणण्याकरिता करतात. द्वितीय महायुद्धाच्या प्रारंभापूर्वी एकट्या अमेरिकेतच सुमारें वीस चक्रायणें मोठमोठ्या प्रयोगशाळांतून बसविलीं गेलीं होतीं. तसेंच रशियामध्ये दोन तीन, इंग्लंडमध्ये दोन तीन, डेन्मार्कमध्ये एक, फ्रान्समध्ये एक आणि जपानमध्ये तीन याप्रमाणे इतरत्रहि चक्रायणें कामांत होतीं. [९]चिकित्साप्रयत्नांच्या कामीं आणि वैद्यकीय समन्वेषाच्या कामीं कृत्रिमरीत्या बनविलेलीं रादनिकद्रव्यें (विरादनिकद्रव्यें) उपयोगांत आणिलीं जात, तीं द्रव्यें अशा चक्रायणाच्या द्वाराच सिद्ध केलीं जात.

---

१ Atomic structure hypothesis. २ sq. cm.
३ Electro-magnet. कर्पुक magnet. ४ Electric arc. ५ High frequency.
६ voltage. ७ Alternating. ८ Transmutation of nucleus.
९ चिकित्सा म्हणजे रोगनिवारण, रोग बरे करण्याकरता उपाय करण. " चिकित्सा रुक्प्रतिक्रिया."

११. Deuterium द्विरुज्ज. यालाच गुरूज्ज असेंहि नांव आहे. सामान्य उज्जाच्या अणूबरोबरच गुरूज्जाचे अणूहि ५००० त एक इतक्या अल्प प्रमाणांत आढळतात. १९३२ सालीं कोलंबिया विश्वविद्येचे यूरे (Urey) यांना ही उपलब्धि झाली. साधा उज्ज आणि गुरूज्ज यांचा रासायनिक आचारधर्म अगदीं एकच, त्यांत फरक नाहीं, अणु मात्र एकाच्यापेक्षा दुसऱ्याचा दुप्पट गुरु अथवा भारी.

१२. Deuteron उद्वेक. गुरूज्जाच्या (अ० द्विरुज्जाच्या) अणुगर्भाला हें नांव आहे. साध्या उज्जाच्या अणुगर्भामध्ये वस्तुक मुळीच नसून केवळ धानक मात्र एकच एक असतो; तर द्विरुज्जाच्या अणुगर्भामध्ये एका धानकाशीं निगडित एक वस्तुकहि असून या कारणाने त्या अणुगर्भाची वस्तुता 'द्वि' म्ह० दोन लव इतकी होत्ये पण धनोच्चय मात्र अर्थात् एकच राहतो. म्हणून या द्विरुज्जाच्या अणुगर्भाला उद्वेक असें नांव पडतें. ( उज्ज यांतील उ, द्वि यांतील द्व् आणि शेवटीं एक = उद्वेक. )

१३ Electron [1]वीजक. ऋणोच्चयाचे अल्पिष्ठ[2]. अणुपरिसरामध्ये भ्रमद्वीजकच काय ते असतात. परिसरामध्ये भ्रमद्वीजकांची संख्या जितकी तितकीच अणुगर्भामधील धानकाची संख्या. धानक धनोच्चयी आणि वीजक ऋणोच्चयी यामुळेंच एकंदर अणूचें धनऋण तुल्य होऊन तो अनुच्चयी बनतो. धानकांची संख्या 'अणुक'ने निर्दिष्ट केली जाते हें मागें 'अणुक' यावरील टीपेंत आलेलेंच आहे. एखाद्या तारेंतील वीजवहाळ म्हणजे तिच्यामधील वीजकांची मोकळेपणें चाललेली वाहतूकच होय. जशी एखाद्या रस्त्यांतून वाहनांची वाहतूक चाललेली असत्ये तशीच ही तारेंतून चाललेली वीजकांची वाहतूक होय. एखाद्या तारेंतून वीजवहाळ '१ ओघ' (1 Amp.) इतकी जर चाललेली असेल तर त्याचा अर्थ असा की विपळागणिक तारेच्या अवच्छेदांतून ६·२४ प्रयुत प्रयुत प्रयुत इतके वीजक वाहत आहेत. रिसंद्वा[3] मध्ये वीजकांचीच वहाळ असत्ये. तसेंच चरिशामध्ये[4] हि वीजकांच्या शलाकाच्या शलाका कुंचल्याने चित्र रेखाटावें तसें काम करीत असतात. रादनिक द्रव्यांमधून जी फिशारी बाहेर पडत्ये त्यांतील 'ब' अल्पक म्हणजे वीजकच होत. मात्र हे वीजक, वेगस्वी म्ह० अत्यंत वेगवान् असतात.

१४. Electron-Volt ऊर्जवी (ऊर्ज-वीजक या जोड शब्दाचा संक्षेप). एक वीजक एक ऊर्ज इतक्या [5]क्षितिभेदातून खेचला असतां त्याला जी शक्तिसंपन्नता येईल ती = १ ऊर्जवी : १ प्रयुत $(=१०^६)$ ऊर्जवी = १ प्रोर्जवी.

१५. Element मौल. संयुग द्रव्यांच्या मुळांत असलेलीं मौल द्रव्यें उदा० उज्ज, ऊर्व, अर्व, औम्र इत्यादि. प्रत्येक मौलाचा निर्देश करण्याकरितां एकेक रासायनिक चिन्ह नेमिलेलें असतें. उदा० उ = उज्ज, ऊ = ऊर्व, अ = अर्व इत्यादि. संयुग = compound.

अणु Atom वरील टीप पाहा।

१ धातु : वि + ईन्.

२ अल्पिष्ठ = लहानांत लहान अंश.

३ रिसंद्वा = radio valve रिक्त संवह द्वारक अथवा रिणवीजक संवह द्वारक संक्षेपें द्वारक किंवा रिसंद्वा केला तरी चालेल.

४ चल रिण शलाका. शलाका = सरळ धार—पाण्याच्या धारेसारखी. फवारा. Cathode ray tube = चरिश.

५ Potential difference. ऊर्ज = volt.

१६. Energy शक्ति, तेज. वास्तवशास्त्रांत 'शक्ति'ची व्याख्या 'कृतसंपादन सामर्थ्य'[१] अशी आहे. प्रेरकाने[२] प्रतिप्रेरकावर चढाई करून त्याला त्याच्याच वाटेने मागे हटवीत नेलें म्हणजे 'प्रेरक × तच्चलित = कृत' याप्रमाणे कृतसंपादन होतें. अमुक वस्तुतेचा पदार्थ अमुक वेगांत आहे असें असेल तर त्यांतील शक्तिसंपद् = ½ वस्तुता × वेग² ("वस्त्वर्धे वेगवर्गेण") असें होतें. हें समीकरण वापरतांना, अर्थात् एकधेयें कोणतीं वापरावयाचीं, तीं सुसंगत आहेत किंवा नाहीत या गोष्टीकडे लक्ष्य द्यावें लागतें. शक्ति वेगीय[३] असेल किंवा वर्चसीय[४] असेल. 'वस्त्वर्धे वेगवर्गेण' हें सूत्र वेगीय शक्तीचें मान करतांना उपयोगी पडतें, तसेंच प्रेरक × तच्चलित = कृत म्ह० कृतसंपादनसामर्थ्य = वर्चसीयशक्ति हेंहि विधान वर्चसीय शक्ति मोजण्याच्या कामीं उपयोगी पडतें. प्रथमतः किंवा आपाततः शक्ति शब्द स्थूलांच्या संबंधें लावला जातो; आणि तेज शब्द सूक्ष्मासंबंधें बोलला जातो. उदा० उष्मरूपी तेज, प्रकाशरूपी तेज, पाचक तेज, रासायानिक तेज, इत्यादि. पण पुढे पुढे स्थूल-सूक्ष्म हा भेद बाजूला ठेवून शक्ति हा शब्द सुव्याख्यातपणें गणितरीत्या सरसकट वापरतां येतो. उदाहरणार्थ 'अणुशक्ति' या ठिकाणीं.

---

## सुस्वागतम्—

अलीकडे कांही नवीन नियतकालिकें निघालीं असून, कांही प्रकट होण्याच्या बेतांत आहेत. प्रो. श्री. म. माटे ह्यांचें 'रोहिणी', श्री. दा. न. शिखरे ह्यांचें 'महात्मा' हीं मासिकें अवतीर्ण झालीं असून, श्री. शंकरराव देव-पुरस्कृत 'नवभारत', य. गो. जोशी-प्रकाशन 'प्रसाद' ह्यांच्या आगमनाच्या नौबती झडूं लागल्या आहेत. ही झाली पुण्याची वार्ता. मुंबई मराठी साहित्य संघाकरितां श्री. वामनराव ढवळे यांनी संपादलेल्या 'साहित्य' नियतकालिकाचे दोन अंक प्रसिद्ध झाले आहेत. उत्कर्ष, निर्धार, क्षितिज, प्रतिभा हीं प्रकाशनेंहि ठिकठिकाणीं पाउलें टाकूं लागलीं आहेत. नियतकालिकें वाढलीं तरी व्यासंगी लेखक त्या प्रमाणांत वाढले आहेत असें वाटत नाहीं. तेच अग्रेसर लेखक संपादकांच्या लाग्याबांध्याने विभागले जाणार. तरी पण नवीन लेखकांना अगत्याने स्थान देण्याचें कांही संपादकांनी आवर्जून जाहीर केलें आहे आणि कांहींनी तसें जाहीर केलें नसलें तरी त्यांच्याकडून आपोआप तसेंच घडणार आहे. उपरोक्त नियतकालिकापैकी कांहींची धुरा अनुभवी व अभिरुचिसंपन्न संपादकांनी घेतलेली आहे. तेव्हा, लेखकांची नवीन पिढी निर्माण करण्याचें श्रेय, त्यांनी मनांत आणल्यास, त्यांना अलभ्य नाहीं. तेव्हा, ह्या सर्वांचें आम्ही मनःपूर्वक स्वागत करून त्यांना कर्तृत्वशाली दीर्घायुष्य चिंतितों.

---

१ Work. २ Force. ३ Kinetic. ४ Potential.

**हस्तलिखित अंत्याक्षरी कोश** : ले० चिंतामण गणेश कर्वे

मराठींत अंत्याक्षरी कोश अद्यापि नाही. अंत्याक्षरी कोशांत शब्दांच्या शेवटचीं एकसारखीं अक्षरें जुळवून दिलेलीं असतात. उदा०—चरक, फरक, सरक, इ०. अशा कोशाचा उपयोग कवींना यमक साधण्यासाठी होतो. प्रस्तुत कोश इंदूरचे कै. केशव रामचंद्र सप्रे यांनी १९०० सालीं तयार केला व तो छापण्यासाठी छापखानाहि घातला. पण दुर्दैवाने त्यांच्यावर १९०४ सालीं मृत्यूचा घाला येऊन कोशाची प्रसिद्धीची तयारी तशीच राहिली.

श्री. सप्रे यांचा जन्म उज्जनी येथे १८६५ सालीं झाला. मराठी शिक्षणानंतर त्यांनी इंदूर संस्थानांत नोकरी धरली. त्यांना कविता करण्याचा छंद असे. त्यांच्या या कोशांत मधून मधून यमकें आणि अनुप्रास यांना लागणारे शब्द देतांना त्यांचा कवितेंत त्यांनी उपयोग करून दाखविलेला आढळतो. आपले गुरु बडोद्याचे प्रसिद्ध दादाबुवा यांच्या नांवाने त्यांनी मानसपूजेसंबंधी एक काव्य रचल्याचें समजतें.

अंत्याक्षरी कोशांतील त्यांची एक कविता नमुन्यासाठी देत आहों—

गप्पा छाटि बहूपरी तरकटी खेळे सदा सोंगटी,
सेवी नित्य बुटी वसे तृणकुटीं भापा असे रानटी।
वेश्येच्या कपटीं गृहास घिरटीं लाभे तया चापटी,
हाकाटी निवटी प्रकाश दिवटी ऐसी धरीं तूं अटी ॥

[यांत खाडाखोड, शुद्धि, पाठभेद इ० प्रकार काव्यप्रसूतीच्या परिश्रमांचे निदर्शक आहेत.]

हा अंत्याक्षरी कोश प्रथम एकाक्षरी शब्द, नंतर अकारविल्हाने अंत्याक्षरें याप्रमाणे शब्द जुळवून तयार केला आहे. १ संस्कृत प्राकृत कोश ( तळेकर ), २ शुद्ध मराठी कोश ( बापट ), ३ रत्नकोश ( बीडकर ), ४ नवनीत ( गोडबोले ), ५ महाराष्ट्र भाषेचा कोश ( क्रमवंत ), ६ वैद्यकलानिधि ( ? ), ७ दासबोध, ८ मराठी ६ वें पुस्तक यांसारखे ग्रंथ आधाराला घेऊन त्यांतून शब्द निवडले. शब्द पुन्हा लिहिण्याचे श्रम टाळण्यासाठी मूळ आधारग्रंथांतील पानें फाडून, शब्द कातरून घेऊन वह्यांवर चिकटविले आहेत. सर्व शब्द सार्थ दिले आहेत. वह्या पुन्हा तपासून नवीन नोंदी घातल्या आहेत. अशा वह्या ५० असून त्यांची एकूण पृष्ठसंख्या २२६४ आहे. प्रत्येक वहीवर पृष्ठसंख्या, शब्दसंख्या, तपासल्याचे शेरे, कुलदेवतास्मरण इ० बिनचूक दिलें आहे. या कोशांत आलेल्या शब्दांची संख्या ३७०६२ भरते.

हा कोश कोशकारांचे चिरंजीव डॉ. गो. के. सप्रे यांनी माझ्या हवालीं करून याचें कांही चीज होण्यासारखें असेल तर करावें अशी विनंती केली. वडील वारले तेव्हा डॉक्टर एक वर्षाचे होते. आता कर्ते झाल्यावर आपल्या वडिलांचे अज्ञात लेखनपरिश्रम विद्वानांना तरी कळावेत म्हणून पितृप्रेमाने त्यांनी इंदूर भागांतील प्रसिद्ध साहित्यिकांना हा कोश दाखविला. पण कांही होईल असें न वाटल्यावरून त्यांनी तो इकडे पाठविला.

आज प्रस्तुत अंत्याक्षरी कोश छापणें जमणार नाही व छापला तरी त्याचा तसा फारसा उपयोग ( कवींखेरीज ) कोणाला होणार नाही. तेव्हा मराठी भाषेसाठी झटणाऱ्या एखाद्या मध्यवर्ती संस्थेकडे तो ठेवावा, म्हणजे ज्यांना जरूर पडेल ते त्याचा उपयोग करतील व पुढे सुयोग आल्यास एखाद वेळीं तो प्रसिद्धहि करतां येईल. असा मी विचार ठरवून डॉ. मजकुरांची संमति घेतली व तो आता महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या स्वाधीन करीत आहें. परिषद् त्याचें नीट जतन करून अभ्यासकांना त्याचा उपयोग करून देईल व सुस्थिति प्राप्त झाल्यानंतर मूळ संपादकाच्या नांवाने प्रसिद्ध करील अशी आशा बाळगतों.

———

अनुक्रमणिका

# — परीक्षणें —

## इतिहासः—

**विक्रमस्मृति**— प्रका० सिंधिया ओरिएंटल इन्स्टिटयूट, उज्जैन; मूल्य दहा रु.

ग्वाल्हेरच्या द्विसहस्राब्दिमहोत्सवमंडळाने पांच विद्वानांचें एक संपादकमंडळ नियुक्त करून त्याच्या करवीं हा विक्रमकोशस्वरूपी ग्रंथ तयार करून घेतला. चार वर्षांपूर्वी विक्रम-संवताला २००० वर्षें पुरीं झालीं त्यानिमित्त विक्रममहोत्सव कांहीं ठिकाणीं झाले. विशेषतः ग्वाल्हेर संस्थानाने पुढाकार घेऊन उज्जयनी ही विक्रमाची राजधानी संस्थानच्या हद्दींत आहे म्हणून हा उत्सव उत्कृष्ट रीतीने साजरा करून आपला विक्रमाच्या गादीवरील वारसा पटवून दिला. यासाठी ग्वाल्हेरच्या महाराजांचें भारतीयांनी अभिनंदन केलें पाहिजे.

विक्रम, हा शककर्ता विक्रम, ही व्यक्ति झालीच नाही, एथपासून कालिदासादि (विविध कालांतील) कवि विक्रमाच्या दरबारीं चमकत होते, एथपर्यंत उत्तरदक्षिणध्रुवांइतकें अंतर असणारीं मतें प्रतिपादण्यांत येतात. विक्रमादित्य ही पदवी असून ती धारण करणारे अनेक वंशांतील राजे होऊन गेले हें कांहीं विद्वानांनी दाखवून दिलें आहे व ज्याचें नांव शककर्ता म्हणून गाजलें तो अमुक राजा असला पाहिजे असें सिद्ध करण्याचा चांगला प्रयत्न केला आहे. डॉ. दे. रा. भांडारकर यांच्या मतें शुंगवंशप्रस्थापक पुष्यमित्र हाच विक्रमयुगप्रवर्तक, तर डॉ. राधाकुमुद मुकर्जी यांच्या मतें दुसरा चंद्रगुप्त हाच तो विक्रम होय. दोन हजार वर्षांपूर्वी माळव्यांत राजसत्ता होती कीं तें मालवांचें गणराज्य होतें हाहि वादग्रस्त प्रश्न प्रस्तुत ग्रंथांत चर्चिला आहे.

दोन हजार वर्षांपूर्वीचा इतिहास साकल्याने यावा म्हणून या काळच्या संस्कृतिसंबंधानेहि कांहीं लेख घेतले आहेत, तर आजच्या ग्वाल्हेरचा अवंतीशीं निकट संबंध जोडून दाखविण्यासाठी अर्वाचीन ग्वाल्हेरचा इतिहासहि यांत दिला आहे. 'विक्रमस्मृती'चे तीन खंड केले आहेत. पहिल्या खंडांत विक्रमाविषयीं लेख, दुसऱ्यांत विक्रमकालीन म्हणजे दोन हजार वर्षांपूर्वीची संस्कृति दाखविणारे लेख, व तिसऱ्या खंडांत अवंतिकेपासून ग्वाल्हेरपर्यंतचा दुवा जोडणारे लेख, याप्रमाणे लेखांची विभागणी केली आहे. व ती चांगली आहे. संपादकांनी उलटसुलट मतांच्या लेखांनाहि जागा करून दिलेली असल्याने त्यांचा निर्विकारपणा दिसून येतो. त्यांच्या अपेक्षेप्रमाणे आणखी पंडितांचे लेख येते तर हा पूर्ण विक्रमज्ञानकोशच बनला असता.

या स्मृतिग्रंथांत सुमारें पन्नास विद्वानांचे लहानमोठे लेख आहेत. कांहीं विद्वान महाराष्ट्रीयेतर असून त्यांचे संशोधकीय लेख भाषान्तर करून यांत घातले आहेत. हे सर्व लेख वाचून नवीन उपयुक्त ज्ञान मिळाल्याचा वाचकास आनंद वाटेल. लेखकांचें दीर्घाभ्यासफल सहज हातीं लागेल. लेखांच्या शीर्षकाभोंवतीं जीं रेखाचित्रें काढलीं आहेत तीं अगदी यथोचित आणि कलादर्शक आहेत. ग्रंथ सजविण्यासाठी फार कसोशी केलेली आहे यांत शंकाच नाही.

विक्रमसंवताचा प्रवर्तक खरा असो कीं खोटा असो, त्याच्या नांवानें निघालेला हा ग्रंथ शककर्त्या व्यक्तीचें असें मोठें वाङ्मयस्मारक करण्यास प्रवर्तक ठरेल हें खोटें नाही.

ग्रंथांतील एवढ्या लेखांचा परामर्श घेण्यास किंवा परिचयहि करून देण्यास येवढा स्थलावकाश कोठे आहे ? तथापि वरील तोंडओळखीवरून अंतरंगाची कल्पना येईल. ग्वाल्हेर-सारख्या महाराष्ट्राबाहेरच्या ठिकाणीं एवढें मोठें संकलनकार्य झालें याचा महाराष्ट्रालाहि अभिमान वाटला पाहिजे. बृहन्महाराष्ट्रांत अशीच मराठी वाङ्मयासंबंधी आस्था वाढत राहावी अशी आमच्याप्रमाणे सर्वांची सदिच्छा असणार.

चिं. ग. कर्वे

## चरित्रः—

काळकर्ते शिवरामपंत परांजपे—जीवन. लेखक— श्री. वा. कृ. परांजपे, पृ. ३२०; मूल्य ५ रु.

गेल्या पिढींतील एका थोर देशभक्ताचें व साहित्यसेवकाचें हें चरित्र अनेक दृष्टींनी आकर्षक झालें आहे. शिवरामपंतांच्या नातवानेच हें चरित्र लिहिलें असल्यामुळे आपुलकी व जिव्हाळा या गोष्टी या ठिकाणीं भरपूर आहेत. आणि तें स्वाभाविकहि आहे. पण चिकित्सक विवेचनाला मात्र यामुळे मुळीच बाध आलेला नाही तें आवर्जून सांगितलें पाहिजे. 'हा जीवन-वृत्तान्त' आहे असें खुद्द चरित्रकारानेच म्हटलें आहे. यामुळे शिवरामपंतांचें संपूर्ण स्वभाव-चित्रण करणें जरा अवघडच झालें आहे अशी त्याने कबुली दिली आहे. पण स्वभावचित्र रेखाटणें ही गोष्ट कठिण झाली असली तरी शिवरामपंतांच्या अनेक क्षेत्रांतील अनेकविध उद्योगांच्या वर्णनांत त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची संपूर्ण ओळख पटावयास कांहीच हरकत नाही असें वाटतें. स्वभावचित्रणावर एखादें स्वतंत्र प्रकरण लिहावयास पाहिजे असें नाही. साहित्य-सेवक, राजकारणाची तात्त्विक चर्चा करणारे, राजकीय चळवळींत प्रत्यक्ष अंग मोडून प्रामाणिक-पणें काम करणारे वक्ते, पत्रकार इत्यादि ज्या अनेक भूमिका शिवरामपंतांनी 'निरलसतेने व तन्मयतेने वठविल्या त्यांचा वृत्तान्त श्री. वामनराव परांजपे यांनी जिव्हाळ्याने व रसाळपणें सांगितला आहे. यामुळे शिवरामपंतांच्या व्यक्तित्वाचे निरनिराळे पैलू अगदी ठसठशीतपणें प्रकट झाले आहेत.

थोर माणसाच्या आयुष्यांतील दैनंदिन खाजगी गोष्टींना फारसें महत्त्व नसतें. त्याचें सामाजिक जीवन हेंच महत्त्वाचें असतें आणि यामुळे शिवरामपंतांच्या सार्वजनिक उद्योगांच्या वर्णनाने प्रस्तुत चरित्राचा जवळ जवळ सर्व भाग व्यापला असल्यास त्यांत कांही नवल नाही. एक विशेष गोष्ट अशी कीं शिवरामपंतांच्या लेखनाची पार्श्वभूमि चरित्रकाराने यथोचित विशद केली आहे. शिवरामपंतांच्या लेखनांत कल्पनाविलास भरपूर असला तरी त्यांतील बराचसा भाग आत्मप्रत्ययावर आधारलेला असल्यामुळे या पार्श्वभूमीचें ज्ञान आवश्यक आहे. पंतांच्या लेखनांत प्रामुख्याने प्रतीत होणाऱ्या वक्रोक्ति या गुणाची चरित्रकाराने मांडलेली उपपत्ति

महत्त्वाची आहे. या वक्रोक्तींच्या परिणामाचेंहि त्याने उत्कृष्ट वर्णन केलें आहे (पृ. १००–१०४). शिवरामपंत वक्रोक्तीमध्ये कुशल असले व त्यांच्या उपहासाच्या तडाख्यांत सांपडलेली व्यक्ति छिन्नविच्छिन्न झाल्यावांचून राहिली नाही हें खरें असलें तरी त्यांनी 'चांगल्या गोष्टींचा उपहास कधीच केला नाही' अशी वामनरावांनी ग्वाही दिली आहे ती अगदी रास्त आहे. उपहास या शस्त्राचा कोणत्या गोष्टीच्या बाबतींत उपयोग करावा हें पंतांना चांगलें माहीत होतें. उपहास्य गोष्टीचाच उपहास करण्यासाठी त्यांनी वक्रोक्तीचा उपयोग केला हें स्पष्ट आहे. वक्रोक्तीच्याच जोडीला 'काळां'त कल्पनाविलास व विचारसौंदर्य याची कशी खैरात होत असे हेंहि वामनरावांनी सोदाहरण दाखविलें आहे. मधून मधून ते एखादी मोठी मार्मिक उपमा अथवा दृष्टान्त वापरून आपला अभिप्राय परिणामकारक रीतीने प्रकट करतात; उदा० 'काळकर्त्यांनी आपल्या अग्रलेखावर दिलेला मथळा हा पुष्कळ वेळेला ज्वालाग्राही पदार्थ भरलेल्या पार्सलावर एखाद्या सोवळ्या व निरुपद्रवी वस्तूचें लेबल चिकटविल्यासारखा भासत असे' (पृ. १०७). हें वर्णन मार्मिक नाही असें कोण म्हणेल ? परांजपे व टिळक यांच्यासंबंधाचें वर्णन करतांना वामनराव म्हणतात, "गंगा-यमुनांचे प्रवाह संमीलित होऊन समुद्राला मिळण्याकरिता एकाच दिशेने व एकत्र वहात जातात पण त्यांचें पाणी एकमेकांत मिसळत नाही" त्याप्रमाणेच या दोघांच्या कार्याची व संगतीची स्थिति होती" (पृ. १२३).

वामनरावांची विवेचनपद्धति आकर्षक आहे. सफाईदार व परिणामकारक भाषेची देणगी त्यांना लाभलेली आहे. शिवरामपंतांच्या निधनप्रसंगाचें वर्णन या दृष्टीने उल्लेखनीय आहे. एक दोन वाक्यें पाहा---'उगवत्या शुक्रवारीं सकाळीं ७ वाजण्याचे सुमारास मागे धुगधुगी राहिलेल्या पार्थिव शरीरांतली चैतन्याची ज्योतहि निघून गेली ! 'काळ' पत्र चालू असतांना दर शुक्रवारीं सकाळीं त्यांच्या वाड्यांतून 'काळ' बाहेर पडत होता. पण अखेर 'काळा'ने दावा साधून शुक्रवारीं सकाळीं त्यांनाच बाहेर काढलें ! स्वातंत्र्योपासकाच्या या स्वर्गारोहणाच्या वेळीं आभाळालाहि धारा लागल्या होत्या !"

पण या चरित्राचें खरें वैशिष्ट्य माझ्या मतें अगदी वेगळें आहे. शिवरामपंतांच्या राजकारणांतील भिन्न भूमिका विशद करण्यांत व त्यांतील मर्म प्रकट करण्यांत वामनरावांनी मोठेंच यश मिळविलें आहे. एका काळीं हिंसावादाचा व सशस्त्र क्रांतीचा कडाडून पुरस्कार करणारे शिवरामपंत गांधीजींच्या अहिंसावादाचा तितक्याच जोराने पुरस्कार करूं लागले ही गोष्ट अनेकांना कोड्यासारखी वाटते व आपापल्या मनांतील दूषित पूर्वग्रहांच्या अनुरोधाने आपल्याला अनुकूल अशी उपपत्ति ते लावीत असतात हें नेहमी दिसून येतें. वामनरावांनी या सर्वच प्रकाराची उत्कृष्ट मीमांसा केलेली आहे. 'या चळवळींत शिवरामपंतांना क्रांतीचीं अस्पष्ट बीजें दिसलीं म्हणूनच ते तींत सामील झाले' असें म्हणून वामनराव पुढे म्हणतात, "कौन्सिल-प्रवेशावर त्यांचा भर पूर्वीहि नव्हता. येऊन जाऊन या चळवळीचें अनत्याचारित्व किंवा अहिंसा हिंसावादी शिवरामपंतांनी कशी पत्करली याचा कित्येकांना अचंबा वाटतो. परंतु प्राप्त परिस्थितींत अहिंसेचें धोरण हें सोईस्कर, चुरखा किंवा पांघरूण म्हणून बेगें योग्य व इष्ट आहे, असें त्यांचें मत असे. खाजगी चर्चेंतून ते हेंच सांगत...शिवाय अत्याचारयुक्त म्हणा किंवा विरहित म्हणा, पण असहकारितेशिवाय दुसरा कोणताच लढाऊ कार्यक्रम देशापुढे त्या वेळीं नव्हता." (पृ. २३९) अलिकडेच प्रसिद्ध झालेल्या 'काळांतील निवडक निबंधां'च्या ७ व्या भागाला

श्री. शि. ल. करंदीकर यांची जी प्रस्तावना आहे तिच्यांत याच घटनेची त्यांनी कशी 'हिंदुत्वनिष्ठ' मीमांसा केली आहे हें मुळांतून पाहावें.

'असहकारिता विरुद्ध कौन्सिल-प्रवेश' हें सबंध तेरावें प्रकरण मार्मिक विवेचनाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. फेर-नाफेर, प्रतियोगी सहकारिता व असहकारिता, अत्याचार व अनत्याचार इत्यादि राजकारणी द्वंद्वांची तत्तत्कालीन परिस्थितीच्या आधारें वामनरावांनी मोठी उद्‌बोधक चर्चा केली आहे व स्वतः शिवरामपंतांच्या बदलत्याप्रमाणे भासणाऱ्या राजकीय भूमिकेचें स्वरूप विशद केलें आहे. हें करीत असतां प्रतियोगी सहकारितेच्या तत्त्वांतील वैगुण्यांचा त्यांनी आजोबांच्या पद्धतीला अनुसरून मार्मिक उपहास केला आहे (पृ. २६४). याच प्रकरणीं वामनराव म्हणतात—"शिवरामपंत हे अंध गांधीभक्त कधीच झाले नव्हते. पण त्यांनी गांधींचा स्वार्थत्याग ओळखला होता. गांधींची सरकारविरोधी वृत्ति त्यांना मनोमन पटलेली होती. संघशक्ति वाढविण्याचें आणि जनतेंत आत्मविश्वास व स्वावलंबन उत्पन्न करण्याचें गांधींचें सामर्थ्य शिवरामपंतांच्या डोळ्यांआड होणें शक्य नव्हतें." श्री. तात्यासाहेब केळकर यांनी शिवरामपंतांवर व त्यांच्या राजकारणी भूमिकेवर केलेल्या टीकेलाहि वामनरावांनी सडतोड उत्तर दिलें आहे. व हें करीत असतां शिवरामपंतांच्याच लेखनांतून भरपूर आधार दिले आहेत. २७२ ते २७७ हीं पृष्ठें यासाठी जरूर पाहावीं.

अशा प्रकारें शिवरामपंतांचा जीवनवृत्तान्त कथन करीत असतां त्यांची साहित्यसेवा, त्यांचें वक्तृत्व, त्यांच्या राजकीय चळवळी, त्यांचें कौटुंबिक जीवन, त्यांचें व्यक्तित्व इत्यादि गोष्टींची वामनरावांनी आकर्षक भाषेंत ओळख करून दिली आहे व एक उत्कृष्ट चरित्र लिहिल्याचें श्रेय संपादन केलें आहे.

कर्नाटकाचे पुढारी श्री. गंगाधरराव देशपांडे यांची २४ पृष्ठांची प्रस्तावना या चरित्राला जोडलेली आहे. अनेक घटनांची ऐतिहासिक पार्श्वभूमि समजावून घेण्यास या प्रस्तावनेची चांगली मदत होईल. शिवरामपंतांच्या लेखनांतील वक्रोक्ति १९२० नंतर कां नीरस झाली याचें गंगाधररावांनी पृ. १८ वर केलेलें विवेचन मार्मिक आहे.

महाराष्ट्रसाहित्यांत या चरित्रानें फार मोलाची भर घातली आहे यांत संशय नाही.

**रा. शं. वाळिंबे**

## टीकाः—

(१) **नवीं मूल्यें**—ले० पु. य. देशपांडे; नागपूर प्रकाशन; किं. तीन रुपये.

(२) **वाङ्मयांतील वादस्थळें**—ले० प्रा. वा. ल. कुलकर्णी; स्वस्तिक पब्लिशिंग हाउस, मुंबई; किं. चार रुपये.

**नवीं मूल्येंः**—प्रस्तुत संग्रहांत साहित्य, समाज व कला या विषयांवर नागपूरचे श्री. पु. य. देशपांडे यांनी आपले विचार मांडलेले आहेत. श्री. देशपांडे यांच्या बुद्धिमत्ते-बद्दल आदर असणाऱ्या त्यांच्या चाहत्यांना हें पुस्तक वाचून कितपत आनंद होईल याची

शंका वाटते. मराठी वाङ्मयाबद्दल सामान्यतः जीं ठिकठिकाणीं भाषणें केलीं जातात त्यांत या वाङ्मयाचा अधःपात, मराठी लेखकांचें प्रतिभादारिद्र्य व त्यांच्या कलेबद्दलच्या विपर्यस्त कल्पना याबद्दल इतका कांही शोक केला जातो की आता यापुढे या वाङ्मयांत जें बल व जो चांगुलपणा आहे त्यांचा प्रांजळपणें उल्लेख करणारा निर्मळ वृत्तीचा रसिक जास्त आवेशाने पुढे येईल तर बरें असें वाटल्यावांचून राहवत नाही. स्वतःकडे मोठेपणा घेऊन आपल्या एकांगी वाचनाच्या जोरावर वाटेल तीं भरमसाट विधानें ठोकून देणाऱ्या उपदेशकांचा जो वर्ग आहे, त्यांतच श्री. पु. य. देशपांडे यांचा उल्लेख करतां येईल. त्यांची भाषाशैली जितकी क्लिष्ट आहे तितकीच त्यांची विचारसरणी अस्पष्ट आहे. आधुनिक मराठी साहित्यावर अधिकारवाणीने टीका करण्याचा त्यांनी या ग्रंथांत जो ठिकठिकाणीं आव आणला आहे तो पाहतां, त्यांच्या लेखणींत अजूनहि संयम आलेला नाही असेंच खेदाने म्हणावें लागतें. 'नवेपणा'च्या कसल्या तरी अस्पष्ट पण भडक कल्पनांचा नाच त्यांच्या मनांत चालत असावा असें हा ग्रंथ वाचतांना वाटतें. मधून मधून जीं विधानें केलीं आहेत तीं पाहतां एकंदरींत वर्तमानपत्रीय पद्धतीची शेरेबाजी त्यांना आवडत असावी असें वाटतें. ' शेक्सपियर वाचून टीकाकार या व्यक्तीला काय वाटतें हेंच निरनिराळ्या तऱ्हेने वर्णन करून सांगण्यापलीकडे पाश्चिमात्य टीकाकारांचीहि मजल गेलेली नाही ' हें **कलानिर्मिति** या भाषणांतील विधान पाहतां या विषयावर असलें मत देण्याचा आपला काय अधिकार आहे याचा त्यांनी अध्यक्ष या नात्याने व्यासपीठावरून उद्गार काढतांना विचार केलेला अर्थातच दिसत नाही. " अलीकडे तर कलेचें शक्य तितकें नीरस वर्णन करणाऱ्यांनाच टीकाकार असें म्हणण्याचा प्रघात पडूं पाहत आहे " हें विधान असेंच अज्ञान व्यक्त करणारें आहे. " आजचें मराठी वाङ्मय आणि आजचें समाजजीवन यांची ताटातूट झाली आहे " हें वाक्यहि आधुनिक मराठी वाङ्मयाचा खराखुरा व्यासंग नसल्याचा पुरावा म्हणतां येईल. **वाङ्मय व वास्तवता** या भाषणांतील विधानें टीकाकाराच्या आकुंचित व अनुदार वृत्तीचीं द्योतक आहेत. आजकालच्या प्रथितयश लेखकांचा उपहास करण्याची हौस मात्र या भाषणांत भरपूर फेडून घेतलेली आहे. '**यंत्रयुगीन प्रलय आणि कलावंताचें कर्तव्य**' या भाषणांत श्री. देशपांडे म्हणतात, " मानवतेचा द्रोह करण्याच्या महान् पापापासून शास्त्रज्ञांना परावृत्त करण्याचें कर्तव्य पार पाडण्याची जबाबदारी इतिहासाने कलावंतांच्या शिरावर टाकली आहे. " कलावंत हे शास्त्रज्ञांना असे आवरूं शकतील असा जो भोळा विश्वास श्री. देशपांडे यांना आहे त्याबद्दल मौज वाटल्यावांचून राहत नाही. '**आधुनिक मराठी साहित्याची भूमिका**' या भाषणांत 'आधुनिक' म्हणजे काय हें सांगतांना लेखक म्हणतात, " असें जें पूर्ण नवें वैशिष्ट्यपूर्ण आणि **पूर्ण व्यक्तिनिष्ठ** तेंच खरें 'आधुनिक' या संज्ञेला पात्र ठरतें." एकंदरींत '**पूर्ण नवें**' व '**पूर्ण व्यक्तिनिष्ठ**' असल्या विचित्र कल्पनांवर त्यांची श्रद्धा आहे तर ! श्री. देशपांडे यांच्या विचारसरणींत सचोटीचा भाग कमीच दिसतो. 'कलानिर्मिति' या भाषणांत ते म्हणतात, " कलाकृति निर्माण करण्याच्या बुद्धीने मीं कधीहि लेखणी हातीं धरली नाही." याच्याबरोबर उलट विसंगत असें विधान '**यंत्रयुगांत प्रलय आणि कलावंतांचें कर्तव्य**' या भाषणांत आढळतें. याप्रमाणे स्वतःबद्दल वेळप्रसंगीं परस्परविरुद्ध व विसंगत विधानें करणाऱ्या टीकाकारालाहि मराठी लेखकांच्या लिखाणांत 'नवी जाणिव, नवा दृष्टिकोन, व्यक्तिव्यक्तींत उदयास येऊं लागलेलें नव्या भूमिकेवरील नवें नातें, नवी मानवता, नवें साफल्य, प्रगतीचीं नवीं क्षितिजें' इत्यादि अस्सल कलेचे विशेष आढळत नाहीत याबद्दल जें वाईट वाटतें, तें आपल्या

सत्यनिष्ठ मनाला जें खरें वाटलें तेंच सांगणाऱ्या प्रामाणिकपणाचें द्योतक नाही काय ? 'कला-निर्मिति' या भाषणांत ते म्हणतात. 'कलेकरिता कला हा एक अर्थशून्य शब्दप्रयोग आहे असें मला वाटतें.' या शब्दप्रयोगाचे सामान्यतः तीन किंवा चार अर्थ आहेत असें विद्वानांनी दाखवून दिलें आहे; हा शब्दप्रयोग अर्थशून्य आहे असे उद्गार काढणारे श्री. देशपांडे हे पहिलेच विद्वान दिसतात ! आपल्याला जी कल्पना पटत नाही ती अर्थशून्य आहे असें समजणाऱ्या व्यक्तीला 'नवा' या शब्दाचा भयंकर हव्यास असलेले श्री. देशपांडे कोणतें नवीन विशेषण लावतील तें पाहणें मनोरंजक ठरेल. सारांश, क्लिष्ट भाषेमुळे व जागतिक संग्रामाची व संघर्षाची भाषा वरचेवर वापरल्यामुळे **नवीं मूल्यें** हा ग्रंथ क्षणभर विद्वत्तापूर्ण वाटला तरी त्यांत खऱ्या व्यासंगांतून निर्माण होणाऱ्या शांत, प्रौढ, समतोल व मौलिक विचारांचा अभावच जाणवतो, असें खेदाने म्हणावें लागतें.

**वाङ्मयांतील वादस्थळें** या ग्रंथांत वाङ्मयांतील कांही महत्त्वाच्या प्रश्नांची चर्चा केलेली आहे. प्रो. वा. ल. कुलकर्णी याची शांत व सोज्ज्वळ भाषा, समतोल वृत्ति व रसग्रहणाची मार्मिक पद्धत यांमुळे हा ग्रंथ वाचकांना प्रिय होईल अशी खात्री वाटते. ग्रंथाला नांव दिल्याप्रमाणे यात चर्चिलेले सर्व प्रश्न वादस्थळें आहेत किंवा होतीं असें नव्हे. पुस्तकांतील बराचसा भाग विविध वाङ्मयप्रकाराचे सर्वसामान्य व सर्वसंमत विशेष वर्णन करण्यांत खर्च झाला आहे. तथापि हे विशेष वर्णितांना देखील लेखकाने ज्या सहजसुंदर रीतीने ते वर्णिले आहेत त्यावरून कांही साहित्य-समीक्षकांप्रमाणे श्री. कुळकर्णी हे पाश्चात्य व विशेषतः इंग्रजी टीकाकारांच्या मताने दबून न जातां धिटाईने, स्वतःचीं परिपक्व झालेलीं मतें मांडणारे निर्भय टीकाकार कसे आहेत तें दिसून येईल. लघुनिबंध, आत्मचरित्र, चरित्र, ऐतिहासिक व राजकीय कादंबरी इत्यादि वाङ्मय-प्रकारांबद्दलचें त्यांचें विवेचन जितकें शास्त्रशुद्ध तितकेंच स्वच्छ व सोप्या भाषेमुळे मनोरंजक झालें आहे. चरित्रलेखनावरील लेख व्हर्जिनिया वूल्फच्या लेखाचा अनुवाद आहे. या विषयावर वूल्फचीं मतें विचारांत घेऊन स्वतंत्र लिहिणें प्रा. कुळकर्णी यांना अशक्य नव्हतें. ते जर असे स्वतंत्र लेख लिहिते तर मूळ लेखाच्या जाचामुळे भाषेंत जो एकप्रकारचा कृत्रिम अर्धवटपणा आलेला आहे तो आला नसता. 'शब्दचित्र' या वाङ्मयप्रकाराबद्दल आतापर्यंत कोणी शास्त्रशुद्ध रीतीने चर्चा केलेली नाही, या दृष्टीने श्री. कुलकर्णी यांचें या वाङ्मयप्रकारांबद्दलचें विवेचन मार्गदर्शक वाटल्यावांचून राहणार नाही. कथावाङ्मयांतील मनोविश्लेषणाबद्दल त्यांनी जो इशारा दिला आहे तो नावीन्याचा हव्यास असणाऱ्या कथालेखकांच्या अवखळ उत्साहाला योग्य तें नियंत्रण घालील असाच आहे. संज्ञा-प्रवाहांचें चित्रण करतांना अर्थपूर्ण वास्तवाकडे ( Significant Reality ) दुर्लक्ष करून चालणार नाही असें जें त्यांनी सांगितलें आहे तें कुणालाहि पटेल असेंच आहे. जी संज्ञा-प्रवाहांची नोंद सौन्दर्यदायी व सत्यदर्शी नाही ती वास्तवपूर्ण असली तरी कलेच्या दृष्टीने निरर्थक आहे असें जें त्यांनी स्पष्टपणें सांगितलें आहे तें जेम्स जॉईससारख्या लेखकाचें अनुकरण करण्याचा हव्यास असलेल्या लेखकांनी विचारांत जरूर घेतलें पाहिजे. नूतन् मानसशास्त्राच्या आधारें इंग्रजींत जॉइस, डोरोथी रिचर्डसन्, डी. एच्. लॉरेन्स या कादंबरीकारांनी जी अभिनव पद्धतीची कादंबरी लिहिली आहे तिला इंग्रजींत 'एगोसेन्ट्रिक नॉव्हेल' असें नांव दिलेलें आहे. या कादंबरींत अप्रकट मनाचे विचित्र व लहरी खेळ वर्णिलेले असतात. एक धाडसी प्रयोग या दृष्टीने या नूतन कादंबरीलेखनपद्धतीचें कौतुक करणें भाग आहे; त्याचप्रमाणे जेम्स जॉईससारख्या लेखकांनी मानवी मनाची रहस्यमयता या लेखनपद्धतीच्या

द्वारें जितक्या उत्कटतेने व्यक्त केलेली आहे तितकी पूर्वीच्या कादंबरीकारांनी केलेली नव्हती यामुळेहि संज्ञाप्रवाहाचें चित्रण करणारी कादंबरी एका दृष्टीने अभ्यसनीय आहे यांत शंका नाही ! पण सरतेशेवटीं कलेच्या निकषावर जर हें नूतन लिखाण घासून पाहिलें तर तें निराशाजनकच ठरेल. एक तर निर्दोष कलेंत जी प्रमाणबद्धता असते ती आपल्या निरर्थक तपशीलाने भरलेल्या कादंबऱ्यांत सांपडत नाही. मामवी स्वभावाच्या चित्रणावर कलेची जी हृदयंगमता अवलंबून असते तीहि असल्या केवळ अप्रकट मनाचे अनिर्बंध खेळ दाखविणाऱ्या कादंबऱ्यांत नसतेच म्हटल्यास चालेल. कादंबरीच्या तंत्राबद्दल अलीकडे आमूलाग्र फरक सुचविणारीं क्रांतिकारक मतें इंग्लंड, अमेरिका व जर्मनी या देशांतील कलावंतांनी मांडलेली आहेत. कुणाची तर कादंबरीला तंत्र असें नसतेंच असें म्हणण्यापर्यंत मजल गेलेली आहे. प्रत्यक्ष जीवन जसें असंबद्ध, विचित्र, लहरी, अनिर्बंध आहे, तसेंच कादंबरीतंत्रहि असावें असें म्हणणारे विद्वान् युरोपांत आढळतात. पण नाविन्याचा हव्यास असणाऱ्या या टीकाकारांनी कितीहि त्रागा केला तरी सरतेशेवटीं कथा व स्वभावदिग्दर्शन यांचा सुंदर मेळ साधून लिहिलेली कादंबरी हीच शेवटीं कलेच्या दृष्टीने सर्वश्रेष्ठ ठरणार हें निश्चित ! म्हणूनच संज्ञाप्रवाहाचें चित्रण करणारी कादंबरी अभिनव म्हणून कौतुकास्पद वाटली तरी प्रतिभासंपन्न लेखकाने आपलें शक्तिसर्वस्व वेचावें इतका आदरणीय हा लेखनप्रकार आहे असें मला वाटत नाही. प्रो कुलकर्णी यांचें या विषयावरचें विवेचन त्रोटक असलें तरी मार्गदर्शक वाटेल. सौन्दर्यभावना, काव्यानंद, वाङ्मयांतली आत्मपरता, सत्य, शिव व सौन्दर्य यांचें वाङ्मयांतलें स्थान, वाङ्मयीन संकेत, काव्य व तालबद्धता इत्यादि विषयांवरील संयमशील विवेचन लेखकाच्या व्यासंगाला शोभेल असेंच सुस्पष्ट व विचारपूर्ण आहे. एकंदरींत हा ग्रंथ प्रसिद्ध करून प्रो. कुलकर्णी यांनी मराठी साहित्य-टीकाग्रंथांत एक महत्त्वाची भर घातली आहे असेंच अभिमानाने म्हणतां येईल.

मा. का. देशपांडे

## कादंबरीः—

**वैष्णव**— ले०— शिरवाडकर; धरित्री प्रकाशन, मुंबई; किं. ३ रु.

कांही व्यक्तींच्या जीवनावर परिस्थितीचें इतकें दडपण पडलेलें असतें कीं त्यामुळे त्यांच्या सर्व शक्ति खुरटून जातात. पण कित्येकदा हें दडपण झुगारून असामान्य कर्तबगारीची चमकहि या व्यक्तींच्या आयुष्यांत दिसते. अशाच एका व्यक्तीच्या— मुरारवाडींतील विनायकराव मास्तरांच्या— जीवनांतील कांही सामान्य व असामान्य क्षणांचें हृद्य चित्रण कुसुमाग्रजांनी या कादंबरींत केलें आहे. कादंबरींतील वातावरण वास्तव आहे व विनायकरावांच्या जीवनांतील परिवर्तन असामान्य असलें तरी अस्वाभाविक वाटत नाही. मात्र विनायकरावांशिवाय कोणत्याहि व्यक्तींचें चित्रण ठसठशीत झालें नाही. रंभाजीचें भावरेखन कितीतरी उठावदारपणें करतां आलें असतें. पण लेखकाचा मर्यादित अनुभव या बाबतींत आडवा आला असें वाटतें. विनायकरावांच्या जीवनांत नवचैतन्य निर्माण करणाऱ्या

पत्नीच्या व्यक्तिरेखेंतील अपुरेपणा जाणवतो. भाषा अर्थवाही व प्रसंगानुरूप आहे. ज्या १९४२ मधील आंदोलनानें हिंदुस्थानच्या जीवनांत क्रांति घडवून आणली त्याचें वर्णन स्थाद्भुत दृष्टीनें अगर वर्तमानपत्री पद्धतीनें न करतां एका व्यक्तीच्या जीवनावर झालेला त्याचा परिणाम दाखवून कुसुमाग्रजांनी या आंदोलनाचें योग्य मूल्यमापन केलें आहे.

**गावगुंड— ले॰—ग. ल. ठोकळ; किंमत ३ रु.**

ग्रामीण जीवनावरील ही एक सुंदर कादंबरी आहे. १९४२ सालीं सातारा जिल्हा राजकीय धामधुमीनें व्यापून गेला. प्रतिसरकार निर्माण करणाऱ्या पद्धतशीर प्रयत्नापूर्वी कांही गट स्वतंत्रपणें सरकारविरोधी चळवळ करीत होते. या चळवळींत दहशतवाद असला तरी तींत भाग घेणाऱ्या लोकांच्या राजकीय ध्येयाच्या कल्पना स्पष्ट नव्हत्या. अशाच एका दहशतवादी गटाचा नायक गुणाजी व त्याचा भाऊ जयवंत यांच्या आयुष्याभोंवती लेखकानें कथाभाग गुंफलेला आहे. गुणाजी हा अधिक साहसी व पराक्रमी असला तरी जयवंत हाच कादंबरीचा नायक आहे. त्याच्याच जीवनांतील नवलपूर्ण घटनांभोंवतीं वाचकांचें मन घोंटाळत राहतें. सातारा जिल्ह्यांतील सधन नेकीचा शेतकरी कुशाबा, जातिवंत मराठा कुळांतील गृहलक्ष्मी पारु हीं व्यक्तिचित्रें अतीव सुंदर आहेत. काळू, तान्ही, राणू आवळोजी पाटील या व्यक्ती ठसठशीतपणें रेखाटल्या आहेत. ग्रामीण जीवनाच्या अंतरंगाची ओळख असल्याशिवाय अशीं जितीं जागतीं माणसें वाङ्मयांत येणार नाहीत.

एक मध्यवर्ती कल्पना घेऊन तिचा कलात्मक रीतीनें विस्तार करावयाचा या पद्धतीनें हीं कादंबरी लिहिली नाही. यांतील व्यक्ती जिवंत असल्या तरी त्यांच्या मनोभावनांचें विश्लेषण त्यांत नाही. या भावना सूचित करून नाट्यमय प्रसंगावर कादंबरी उभारणें हेंच लेखकाचें उद्दिष्ट दिसतें. जयवंत व लीला यांच्यांतील विरोध, प्रसंगानें त्यांच्यांत निर्माण झालेलें साहचर्य व अखेरचें मीलन हें सूत्र राखण्याचा लेखकाचा प्रयत्न असला तरी कादंबरींत रसपरिपोष, व्यक्तिचित्रें व प्रसंग या सर्वांच्या साहाय्यानें जी एकता ( Unity ) साधावयाची असते त्यांत लेखकाला संपूर्ण यश आलेलें नाही. लीलाच्या मनांतील द्वंद्व अधिक विस्तारानें दाखवावयाला हवें होतें.

कादंबरींतील प्रसंग मात्र नाट्यपूर्ण व चित्तवेधक आहे. मोटारवर पडलेला डाका, पिसाळ फौजदार व काळू यांचें क्रौर्य, काळूचा मृत्यु, गुणाजी व जयवंत यांची कुशाबाच्या मृत्यूनंतरची भेट, पारूच्या मुलाचा जन्म, हे सर्वच प्रसंग उत्कटतेनें रेखाटले आहेत. करुण, वीर, अद्‌भूत, वत्सल, शृंगार या रसांचा परिपोष करणाऱ्या घटना निवडण्यांत लेखकानें कौशल्य दाखविलें आहे. मराठी वाङ्मयांत ही मोलाची भर आहे.

**सुखाचा लपंडाव— लेखक भा. द. खेर; मूल्य ५ रु.**

मराठी वाङ्मयांत प्रेमकथेला राजकारणाचें ठिगळ देण्याची अनिष्ट प्रथा निर्माण झाली आहे, व त्या प्रथेलाच हा लेखक बळी पडला आहे. या कादंबरीचा नायक कुमार हा संघाचा कार्यकर्ता आहे व नायिका पुष्पमाला ध्येयवादाच्या अंधुक कल्पना असलेली, कुमारच्या कार्यकर्तृत्वामुळें आकर्षिली गेलेली व स्वतःचें ध्येय नसल्यामुळे कुमाराच्या मृत्यूनंतर विफल-जीवन

झालेली अशी आहे. मध्यमवर्गातील तरुणीची प्रेमकथा लिहिण्याचें जर लेखकानें ठरविलें असतें तर तें त्याला यशस्वी रीत्या साधतां आलें असतें. श्री. खेर यांच्या लेखणींत तें सामर्थ्य खास आहे. साधेसुधे प्रसंगहि ते चांगले रंगवूं शकतात. जीवनांतील परस्परविरोधी प्रकृतींचेंहि त्यांना आकलन झालें आहे. पण राजकारणाची फोडणी देऊन आपण कादंबरी अधिक चटकदार करूं हा हव्यास मात्र त्यांनी सोडला पाहिजे.

या कादंबरींत मॉरिस ग्वायर प्रकरणाच्या वेळीं झालेली दुलड, संघाचें कार्य, डॉ. हेडगेवार यांचा मृत्यु, ऑगस्टचें आंदोलन, बंगालचा दुष्काळ हें सर्व कांहीं आलेलें आहे व कथानकाशीं पहिला प्रसंग सोडला तर कशाचाहि फारसा संबंध नाही. ज्या कार्यकर्त्यांचें जीवन रेखाटण्याचें कादंबरीकार ठरवितो त्याच्या पक्षाची पुरेपूर ओळख त्याला (लेखकाला) असावयास पाहिजे. संघाचीं मतें जरी मान्य नसलीं तरी त्यांतील कार्यकर्त्यांना, या कादंबरींत त्यांचा प्रतिनिधी रेखाटण्याचा आव आणून, लेखकानें अन्याय केलेला आहे असें वाटतें. कुमार हा दुसऱ्या वर्गातून प्रवास करतो, संघाचें कार्य करावयाला खेड्यांत एका तरुण मुलीला बरोबर घेऊन जातो, व प्रेमनिराशा झाल्यामुळे कमिशन घेऊन जातो, हें सर्वच अवास्तव आहे.

पुष्पमाला ही पण वाचकाच्या मनाची पकड घेऊं शकत नाही. तिच्या जीवनांत कोणताच निर्धार नाही. ती कुमारला नकार कां देते हेंहि समजत नाही. लाटेवर हेलकावे खाणाऱ्या पानाप्रमाणे आयुष्य असलेल्या या मुलीचें जीवन दुःखी न झालें तरच नवल.

कादंबरींतील मुख्य कथानक व उपकथानक नीट जोडलेलें नाही. डॉ. सतीश यांच्या दवाखान्यांतील वेडी, दादासाहेब, माधुरी यांचा कादंबरींतील कथानकाशीं फारच दूरचा संबंध आहे. संघाचें काम केल्यामुळे पुष्पमालेची शाळेंतील नोकरी जाते. हा वस्तुस्थितीचा विपर्यास आहे.

पहिला आगगाडींतील प्रसंग, त्या निमित्तानें झालेली नायक-नायिकेची आकस्मिक भेट, इतरहि कांहीं प्रसंग, व राजकारणाची सोयिस्कर झुळूक यावरून प्रा. फडक्यांच्या कादंबऱ्यांची छाप लेखकावर पडलेली दिसते. प्रा. फडक्यांच्या तंत्रबद्ध कलापूर्ण कथानकाची जागा मात्र विस्कळित कथावस्तूनें घेतलेली आहे.

वाङ्मयांत राजकारण येऊं देण्यापूर्वी लेखकांना राजकारणाशीं समरस व्हायला लावलें पाहिजे अगर त्यांच्या लेखणीवर निर्बंध घातले पाहिजेत.

**ग. रा. प्रधान**

**अन्तरींची ज्योतः**—ले० य. ग. वझे; प्रका० बी. जे. लाखाणी, लाखाणी बुकडेपो, मुंबई ४; पृ. २७४; मूल्य ५ रु.

विवाहित पुरुषाचा 'अन्य स्त्रीसंग' हा विषय आपल्या कादंबरीकारांना अथवा नाटककारांना अजूनहि अत्यंत जिव्हाळ्याचा वाटत आहे याची साक्ष श्री. वझे यांची ही नवीन कादंबरी देईल. स्वतःच्या पत्नीकडे दुर्लक्ष करून व नवीन स्त्रीच्या मोहपाशांत सर्वस्वीं सांपडून पत्नीच्या सांसारिक सुखाची परवड करणारा भोगातुर नायक आपल्या पूर्ण परिचयाचा आहे. प्रस्तुत कादंबरींतील नायक विजय पत्नीपासून दुरावतो व शीला नांवाच्या एका लावण्यवती व कलासक्त स्त्रीकडे आकृष्ट होतो आणि तीसुद्धा त्याच्याकडे तितक्याच जोरानें आकृष्ट होते.

उभयतांचा परिचय वाढूं नये इतका वाढतो. पण शेवटीं विजयचें मन पुन्हा आपल्या पत्नीकडे वळावें अशी खटपट खुद्द शीलाच करते आणि आपला नायक दरम्यानचें प्रेमप्रकरण विसरून पुन्हा पत्नीकडे धावत येतो.

विजयची पत्नी निर्मला हिचें लग्नापूर्वी कोणा उद्धव नांवाच्या तरुणावर प्रेम होतें. तिचें लग्न इच्छेविरुद्ध विजयशीं झालेलें असतें. पूर्वीच्या प्रेमाच्या स्मृति नष्ट करून पतीशीं एकरूप होण्याचा तिने निर्धार केला असला तरी त्या कामांत तिला यश येत नाही. वाह्यतः त्यांचा संसार सुखी होता. पण त्या संसारांत प्रेमळपणाचें केवळ 'नाटक' उभयपक्षीं चाललें होतें. ती उदासीन होती आणि आपल्याशीं लग्न केल्यामुळे तिला यातना होत आहेत या विचाराने तोहि उदास होता. मुलाने बायकोशीं प्रेमळपणाने बोलावें अशी आईची धडपड सारखी चालू होती.

अखेर मोकळ्या मनाने सर्व गोष्टी बोलावयाच्या असा विचार करून दोघे एकत्र बसतात. परस्परांनी चालविलेल्या लपंडावाची दोघांनाहि जाणीव आहे. या अवघड परिस्थितींतून बाहेर पडण्याचा मार्ग कोणता? तो आपल्यावर खरें प्रेम करीत नसून प्रेमाचें तें केवळ नाटक आहे अशी खात्री झाल्यामुळे कोणत्याहि इतर तरुणीवर त्याने तावडतोब 'खरें' प्रेम करूं लागावें अशी सूचना ती शांत मनानें करते. ती त्याला मुद्दाम 'मोकळा' सोडीत आहे. यायोगें तो आपल्यापासून कायमचा दुरावेल याची तिलाहि जाणीव आहे. तरीसुद्धा हाच एक मार्ग तिला योग्य वाटतो.

आणि याच सुमारास गांवांत पाहुणी म्हणून आलेल्या शीलाचा व त्याचा परिचय होतो व तो दररोज वाढत जातो. तो कलावंत व शीलाहि कलावती व देखणी. फोटोग्राफीचे धडे घेण्याच्या मिषाने ती विजयकडे खेटे घालूं लागते. त्यांची सलगी वाढत आहे हें निर्मलेला दिसत असूनहि ती स्वस्थ बसते इतकेंच नव्हे तर, जेमतेम एका माणसाला उभें राहतां येईल इतक्याच बेताच्या डार्करूममध्ये विजय काचा कशा धुवाव्या याचें प्रात्यक्षिक शीलेला करून देत असतांहि निर्मला कांहीहि करीत नाही. त्या बंदिस्त खोलींत मात्र शीलेच्या हृदयाचे ठोके एकदम वाढूं लागले. त्याने आपल्याला एकेरी हाक मारावी अशी तळमळ यानंतर तिला लागली. त्याचा 'स्नेह' तिला पाहिजे आहे. लँडस्केप रंगविण्याच्या मिषाने तीं दोघेंच दूरवर खाडीच्या कांठीं जातात. तो अर्थात् तिचेंच चित्र रंगवितो. एवंच, ती जशी त्याच्याकडे आकृष्ट झाली होती तसाच तोहि तिच्याकडे आकृष्ट झाला होता.

अखेर ती पाहुणी गांव सोडून जाते. तिचेंच चिंतन करीत तो बसतो. 'तुमचें लग्न झालें नसतें तर!' हे तिचे शब्द त्याच्या कानांत घुमूं लागले. शीला निर्मलेच्या नांवावर, पण वास्तविक विजयलाच उद्देशून, पत्र पाठवते. आणि निर्मलाहि तिला उत्तर पाठविते.

येथपर्यंत कथानक सरळ चाललें आहे. पण यापुढे अनेक अकल्पित व अस्वाभाविक घटनांची लेखकाने अक्षरशः खैरात केली आहे. विजय आपल्या पत्नीकडे परत येतो. ही घटना रंगविण्याची इच्छा असल्यामुळे त्याच्याकडे विलक्षण आकृष्ट झालेल्या शीलेला एकाएकीं समजूतदार बनवून ती निःस्वार्थीपणाने विजयाला त्याच्या पत्नीच्या सहवासांत पाठविण्याची धडपड करते असें दाखविणें लेखकाला भाग पडलें आहे. ती इतकी परोपकारी कां बनते हें कोडें उलगडणें शक्यच नाही. ज्या उद्धव नांवाच्या तरुणावर निर्मलेचें लग्नापूर्वी प्रेम होतें तो ध्येयवादी व सेवाधर्म आचारणारा त्यागी गृहस्थ आहे हें विजयला

दिसून यावें अशी खटपट शीला करते. व निर्मलेचें उद्धववरील प्रेम उदात्त आहे अशी यायोगें खात्री झाल्यावरोबर विजय अगदी धावत पळतच निर्मलेकडे येतो.

या साऱ्या घटनांत कलात्मक सुसंगतीचा पूर्ण अभाव आहे. अनेक दुवे निसटले आहेत. एखाद्या कलावंतावर आसक्त झालेली कलावती तरुणी कोणतेंहि प्रतिकूल कारण घडलें नसतां अगदी अचानक समजूतदार, ध्येयवादी व 'परोपकारी संभूप्रमाणे' परोपकारी वृत्तीची कां व कशी होते याचीं कांही कारणें श्री. वझे यांनी दिलीं असतीं तर बरें झालें असतें. पण दुर्दैवाने त्यांनी असें कांहीच केलें नसल्यामुळे विवाहित पुरुष क्षणैक अन्य स्त्रीकडे आकृष्ट झाला तरी ती अन्य स्त्री जर स्वतःच समजूतदारपणाने दूर गेली तर पहिल्या स्त्रीच्या संसाराचा विध्वंस टळतो ही जी गोष्ट श्री. वझे यांना पटवावयाची आहे ती पटविण्याचें कार्य त्यांना साधतां आलें नाही.

कादंबरीचा अंत कृत्रिम व अस्वाभाविक वाटत असला तरी वझे यांच्या कलात्मकतेच्या इतर कांही खुणा स्पष्टपणें दिसत आहेत. त्यांची भाषा आकर्षक असून संयमाचा मोठा गुण त्यांच्या ठायीं आहे. त्यांची लेखणी कोठेहि अमर्याद झालेली नाही. अगदी पहिल्याच प्रकरणांतील अंबोली घाटांतील वनश्रीचें व मोटारींतील प्रवासाचें वर्णन लेखकाच्या अवलोकनशक्तीची थोरवी पटवितें. तळकोंकणांतील बोलभाषेचा उपयोगहि कौशल्यपूर्ण आहे.

हें सारें खरें असलें तरी आपल्या नवऱ्याचें मन हरप्रयत्नाने आपल्याकडे खेचून घेण्याऐवजी त्याला दुसऱ्या एखाद्या स्त्रीवर प्रेम करावयास राजीखुषीने परवानगी देणारी व नवऱ्याकडे येणाऱ्या तरुण देखण्या मुलीला सर्व प्रकारें उत्तेजन देणारी इतकेंच नव्हे, तर तिला हातभर डार्करूममध्ये नवऱ्यावरोबर एकटीलाच सोडणारी निर्मला श्री. वझे यांना कोठे आढळली हें त्यांचें त्यांनाच माहीत !

रा. शं. वाळिंबे

## लघुकथासंग्रहः —

( १ ) मुमताज—ले० डॉ. अ. वा. वर्टी; धरित्री प्रकाशन, मुंबई.
( २ ) तेरी चूप मेरी चूप—ले० सौ. कमला फडके; नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर.
( ३ ) मोळी—सौ. कुसुमावती देशपांडे; प्रका० देशमुख आणि कंपनी, पुणें २.

मराठी लघुकथाक्षेत्रांत वरील तीन लघुकथा-लेखकांचीं नांवें आज वाचकांना चांगली परिचित आहेत. मराठी लघुकथेला आज ओहोटी लागली आहे अशी टीकाकारांकडून बरीच हाकाटी केली जाते. पण तो मुद्दा विवाद्य म्हणून बाजूला केला तरी आज ज्या कांही नवोदित लघुकथालेखकांकडे वाचकवर्ग मोठ्या अपेक्षेने पाहत आहे त्यांत वरील तीन लघुकथा-लेखकांची गणना होते हें निश्चित आणि त्या दृष्टीने त्यांच्या लघुकथा-संग्रहांचें परीक्षण केलें पाहिजे.

डॉ. वर्टी यांचा हा पहिलाच लघुकथासंग्रह. पण संग्रह निघण्यापूर्वी त्यांचें नांव मराठी रसिकांना चांगलें परिचित झालें होतें. विशेषतः 'किर्लोस्कर' व 'समीक्षका'च्या लघुकथा-चढाओढींत त्यांना पारितोषिक मिळाल्यामुळे त्यांच्या लघुकथालेखनाच्या कौशल्याची साक्ष रसिकांना चांगलीच पटली होती. आणि म्हणूनच एका चांगल्या लघुकथालेखकाचा संग्रह आपण वाचत आहोंत या कल्पनेने वाचक संग्रह वाचावयास सुरवात करतो, पण दुर्दैवाने अपेक्षित समाधान त्याला त्यापासून मिळत नाही.

त्यांनी संग्रहाची सुरवात 'मुमताज' या गोष्टीने केली आहे व शेवट 'सहा मास्तर व मास्तरीण' हिने केला आहे. म्हणजे लघुकथेच्या तंत्राप्रमाणे त्यांनी सुरवात व अखेरी चांगलीच साधली आहे असें म्हणावेंसें वाटतें. 'मुमताज' या लघुकथेला 'समीक्षक' च्या लघुकथा-चढाओढींत पहिलें पारितोषिक मिळालें होतें. व ती लघुकथाहि करुणरम्य आहे. मुमताजचें चित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें करतांना तिच्या मनाचे सूक्ष्म धागेदोरे त्यांनी आपल्या नाजूक लेखणीने कुशलतेने प्रकट केले आहेत आणि तसें करतांना त्यांनी वातावरणाचा केलेला उठाव सुद्धा मोठा परिणामकारक आहे. तसेंच रसनिर्मितीला पोषक असें वातावरण निर्माण करतांना त्यांनी दाखविलेला संयमहि प्रशंसनीय आहे. शेवटची लघुकथा तर या कथासंग्रहाचा कौस्तुभमणी आहे. आज स्त्री-पुरुषांच्या मैत्रीचें स्वरूप पुरुषप्रधान समाजांत शुद्ध ठेवणें किती अशक्य होतें याचें मार्मिक विश्लेषण आपणाला या कथेंत आढळेल. मानसशास्त्रदृष्ट्या सहा मास्तरांची सुधाबाईच्या मैत्रीबाबत झालेली एकच प्रतिक्रिया दाखविण्यांत त्यांनी पुरुषी स्वभावाचे मार्मिक ज्ञान व्यक्त केलें आहे. त्याबरोबर यांतील उपहासहि प्रभावी आहे. मानवी स्वभावाच्या विश्लेषणाबरोबरच सामुदायिक मनाचें त्यांनी 'एक इंच आणि एकच सेकंद' या लघुकथेंत केलेलें विश्लेषण मोठें मजेदार आहे. जनतेच्या प्रवृत्तीचें विश्लेषण करतांना रोमांचकारक-भयानक व परयातनांत आनंद मानण्याच्या त्यांच्या प्रवृत्तीचें उपहासपूर्ण केलेलें चित्रण मोठें गंमतीचें वाटतें. तसेंच आजकाल गडी व मोलकरीण मिळणें कठीण झाल्याने मध्यमवर्गीय समाजापुढे उभा राहिलेला पेचप्रसंग 'वधू पाहिजे' या आपल्या लघुकथेंत त्यांनी गंमतीने सोडून दाखविला आहे. मोलकरीण मिळत नाही म्हणून नाइलाजाने का होईना पण पत्नी आपल्या पतीला दुसरें लग्न करण्याला व त्या योगाने कां होईना पण घरांत हक्काची मोलकरीण आणण्याला संमति देते, इतकेंच नव्हे तर 'वधू पाहिजे' ही जाहिरातहि त्याला लिहून देते. हा विनोदपूर्ण प्रसंग त्यांच्या लेखणीने बहारीनें रंगविला आहे. त्यांनी सुचविलेला उपाय इतरांना कितपत पटेल हा भाग निराळा. 'पश्चात्ताप' ही ४२ च्या लढ्यावर आधारलेली लघुकथासुद्धा बरी आहे.

पण या पांचसहा लघुकथा सोडल्या तर इतर लघुकथा अगदी सामान्य वाटतात. त्यांची विनोदी वृत्ति 'साहेब व गाढव', 'बक्षिसाच्या घोडा' व 'स्टॅनी टीचर' या कथांतून दिसून येते हें खरें—पण हे अगदी प्राथमिक प्रयत्न वाटतात. डॉ. वर्टींसारख्या लेखकांकडून आपण अशा सामान्य गोष्टी अपेक्षीत नाही. पण एकंदरींत मुमताजचें स्वरूप बरेंचसें रम्य व लेखकाविषयी अपेक्षा निर्माण करणारे आहे हें खास.

**'तेरी चूप मेरी चूप'** या संग्रहाच्या लेखिका सौ. कमला फडके यांनीसुद्धा एकेकाळीं 'किर्लोस्कर' मधील लघुकथा चढाओढींत पहिलें पारितोषिक मिळविलें होतें. कमला-

बाईंची लेखनशैली प्रसादपूर्ण असून प्रसंग निवडण्यांत त्यांनी दाखविलेली दृष्टि कलापूर्ण आहे. म्हणून त्यांच्या लघुकथा वाचनीय वाटतात. अद्‌भुतरम्यता त्यांत क्वचित् आढळते– डॉ. वर्टीच्या लेखनांत तर ती फार आढळते– तरी पण त्यांच्या लघुकथा प्रसन्न वाटतात. 'तेरी चूप मेरी चूप' ही त्यांची पहिलीच लघुकथा पाहा. याची उभारणी एका रहस्यावर केली आहे. कथानक अगदी नेहमीचें आहे तरी पण कमलाबाईंच्या कथनपद्धतीच्या कौशल्याने वाचक शेवटपर्यंत जातो. निवेदनपद्धतीचें चातुर्य हाच त्यांच्या कथेंतील मुख्य गुण आहे. एरवी सखोल मनोविश्लेषण त्यांत आढळणार नाही– समाजांतील जळत्या प्रश्नांची त्यांत कधी चर्चा येणार नाही किंवा दलित वर्गाची चित्रेंहि त्यांत येणार नाहीत. मर्यादित समाज, मर्यादित प्रसंग पण आकर्षक निवेदनपद्धति व प्रसादपूर्ण लेखनशैली यामुळे त्यांच्या कथा रम्य वाटतात. या संग्रहांतील 'तेरी चूप मेरी चूप', 'पर्वतपे अपना डेरा' व 'दूरचे डोंगर' या पहिल्या तीन कथा चांगल्या आहेत. 'इंफाळचा राजा' ही लघुकथा मोठी विनोदी व खुसखुशीत झाली आहे. पण त्यांतील मुख्य घटनांचें श्रेय एका आंग्ल लेखकाला आहे हें, कमलाबाईंनी लघुकथेच्या शेवटीं तें ऋण उल्लेखलें नसलें तरी, स्पष्ट सांगितलें पाहिजे. रूपान्तर या दृष्टीने मात्र कथा सुंदर आहे. बाकी या संग्रहांतील त्यांच्या इतर कथा सामान्यच आहेत. दोन तीन चांगल्या लघुकथा देऊन इतर तिसऱ्या प्रतीचा मालमसाला संग्रहांत भरावयाचा हा आजकाल रिवाज झाला आहे.

वरील तीनहि लघुकथासंग्रहांत 'मोळी' मात्र अत्युत्कृष्ट लघुकथासंग्रह आहे. कुसुमावती-बाईंच्या या संग्रहाच्या 'मोळी' या नांवावरूनच कदाचित् आंतील लघुकथांच्या स्वरूपाची कल्पना येईल. दलित व सामान्यपणें उपेक्षित अशा निरनिराळ्या व्यक्तींची व वर्गांची चित्रें त्यांनी मोठ्या जिव्हाळ्याने व सहानुभूतीने रंगवलीं आहेत. 'दगडांची गोष्ट' या त्यांच्या पहिल्या रूपककथेंतच त्यांच्या दृष्टिकोनाची यथार्थ कल्पना येते. 'पूर्वीचें दगडाचें देवालय जाऊन तेथे आता मानवतेचें मंदिर आहे व त्या मानवतेच्या मंदिराचे आम्ही चिरे आहोंत– पूर्वी एकाच दगडाला देवाचें रूप दिलें गेलें होतें– पण आज आम्हां प्रत्येकाच्या अंतर्यामांत दिव्यत्व संचारलें आहे.' या दगडांच्या उद्‌गारांत मानवतेचें नवीन स्वरूप प्रतीत होऊं लागतें. त्याच मानवतेचें दर्शन आपणाला त्यांच्या निरनिराळ्या शब्दचित्रांतून आढळतें. 'जाई बाई', 'लहानी' व 'इन्द्रा' हीं त्यांचीं तीन व्यक्तिचित्रें जितकीं रम्य व सजीव आहेत तितकींच तीं त्यांच्या जीवनांतील विविध प्रश्नांवर विदारक प्रकाश टाकणारीं अशीं आहेत. 'वहाणा' मधील शहरच्या भांडवलदारांकडून फसवल्या गेलेल्या दादाजी चांभाराचें चित्र जितकें करुणरम्य आहे तितकेंच स्वप्नांत सुखाच्या सावलींत शिरणाऱ्या दमडीचें चित्रहि करुणाजनक वाटतें. 'जांभई' व 'त्याची काळजी' या दोन लघुकथा– किंवा भावछटा म्हणा पाहिजे तर– विशेष उल्लेखनीय आहेत. मानवी निष्क्रियता व अफाट विश्व यांतील वाढतें अंतर पहिल्या कथेंत जितक्या प्रभावी रीतीने चित्रित केलें आहे तितक्याच परिणामकारक रीतीने श्रीमंतांच्या व गरिबांच्या काळज्यांतील विरोध त्यांनी 'त्याची काळजी' यामध्ये रंगवला आहे. 'लहरी' व 'संगतीचा झरा' या त्यांच्या दोन लघुकथाहि विशेष उल्लेखनीय आहे.

'मोळी' या कथासंग्रहाचें स्वरूप एकंदरींत निराळेंच आहे. त्यांत रंगवलेलें विश्व निराळें आहे व त्या विश्वाचें चित्रण लेखिकेने अत्यंत जिव्हाळ्याने व सहानुभूतिपूर्ण रीतीने केलें आहे. या मोळीच्या 'शेकोटीच्या ज्वाळांत जीवननृत्याचीं चित्रें अंधुकपणें तरी दिसत राहतील का ?'

अशी शंका लेखिकेने सुरवातीलाच प्रकट केली आहे पण या व अशा मोळ्यांत साऱ्या भारतांत डोंब उसळवून त्यांच्या प्रकाशांत दलितांचें व त्यांची दुःखें समाजाला दाखविण्याचें व त्यांना जागें करण्याचें सामर्थ्य आहे असें म्हटलें तर फारशी अतिशयोक्ति होणार नाही. मात्र त्या मोळींतील लाकडें जमवतांना अंतःकरणांतील अन्यायाची व विषमतेची आग सतत भडकलेली हवी. 'मानव तेहि—मानव आम्ही' ही जाणीवहि सतत अन्तःकरणांत जागृत हवी. कुसुमावतीबाईंच्या अन्तःकरणांत अशी चीड व अशी जाणीव जिवंत असलेली या कथा-संग्रहांतून स्पष्ट दिसते. आणि त्यांच्या जोडीला त्यांच्या काव्यमय लेखनशैलीचा या संग्रहाला लाभ झाला आहे. काव्यमय वर्णन ठिकाठिकाणीं लघुकथेंतून विखुरलेलें आढळतेंच. पण 'चन्द्रास्त' हा त्यांचा लेख तर काव्यमय वर्णनाचा एक उत्कृष्ट नमुना आहे. थोडक्यांत, 'मोळी'ने मराठी लघुकथांच्या दालनांत एक उत्कृष्ट भर घातली आहे असें म्हणतां येईल.

हे तीन संग्रह व 'अनामिका', 'लामणदिवा' वगैरेसारखे इतर कांही संग्रह डोळ्यांसमोर आहेत म्हणूनच मराठी लघुकथेला ओहोटी लागलेली आहे असें मी तरी म्हणणार नाहीं.

म. ना. अद्वंत

पाथेय (लघुकथासंग्रह)— ले० वामन चोरघडे; वीणा प्रकाशन, नागपूर; मूल्य अडीच रुपये.

या संग्रहाला जरी लघुकथासंग्रह म्हणून संबोधलें असलें तरी भावकथा, व्यक्तिचित्रें व लघुकथा असें वैचित्र्य त्यांत आढळतें. श्री. चोरघडे हे तंत्राच्या बाबतींत फारसे खबरदार नाहीत. अर्थात् यामुळे त्यांच्या लिखाणाला विस्कळितपणा आला आहे असें नाही. त्यांची भावपरिपोषाची एक स्वतंत्र पद्धति आहे, व ती त्यांनी या संग्रहांत अत्यंत प्रभावी रीतीने वापरली आहे.

श्री. चोरघडे यांचा जीवनाचा अनुभव विविध आहे; त्यांचें निरीक्षण सूक्ष्म व तरल आहे. त्यांची जगाकडे पाहण्याची एक विशिष्ट दृष्टि आहे व या दृष्टिकोनांतूनच ते सर्व गोष्टी मांडत असल्यामुळे ते वाचकाच्या मनावर ठसा उमटवूं शकतात. जगाकडे पाहतांना त्यांची वृत्ति चिंतनशील असली तरी संन्यस्त नाही. जगांतील आनंदाचा व सुखाचा उपभोग घ्यावा असें त्यांना वाटत असलें तरी त्यांतून सुखवाद अगर अभिलाषा व्यक्त होत नाही. पुनर्जन्म ही लोककथा यामुळे आकर्षक वाटते. 'अतिथि देवो भव' या व इतरहि कथांतून जी एक प्रसन्नता आढळते ती लेखकाच्या (रसिक) रसग्राही प्रवृत्तीमुळेच होय. सामान्य व्यक्तीच्या ठिकाणीं जी निरागसता व निष्पापवृत्ति असते ती 'संस्कार' व 'हादरा' या कथांत दाखविली आहे. जगाकडे मानवतेच्या दृष्टीने पाहणाऱ्या व कर्तव्याविषयी विलक्षण जागरूक असणाऱ्या रशिदमियांच्या जीवनाला सूडबुद्धीने चाललेल्या राजकारणाने कसा 'हादरा' बसला हें लेखकाने फारच कुशलतेने दाखविलें आहे.

श्री. चोरघडे यांनी रंगविलेल्या व्यक्तींपैकी कांहींच्या वांट्याला जरी दुःख आलें असलें तरी त्यामुळें त्यांच्या आयुष्यांत कडवटपणा निर्माण झालेला नाही. 'तीनशें दोन', 'सन्मार्ग' हीं व्यक्तिचित्रें यामुळेच आकर्षक वाटतात. 'पाणथळ' व 'तिच्या आईचें अक्षर' या गोष्टींत पराक्रमी व्यक्तिजीवनाचे धागे उकलून दाखविले आहेत.

ध्येयवादी व्यक्ति व कठोर व्यवहाराची ठेच लागून ध्येयवादाला बसणारा धक्का हेंहि चोरघडे फार सुंदर रीतीनें दाखवूं शकतात. 'परिवर्तन' ही गोष्ट म्हणूनच सर्वोत्कृष्ट वाटते. पूर्वार्धांतील आदर्श जीवनाचें चित्र व शेवटीं मिळणारी अनपेक्षित चुणुक यामुळे वाचकाच्या मनाला चटका लागतो. प्रचारकी थाटानें न लिहितां समाजाच्या अंतरंगांतील दुःखांवर प्रकाश पाडण्याचें या गोष्टींतील कौशल्य असामान्य वाटतें. भाषा कांहीशी संस्कृतप्रचुर असली तरी बोजड खास नाही. विरामचिन्हें, गद्यकाव्य व धूसर वातावरण यांनी भरलेलें लिखाण करणाऱ्या चोरघडे यांच्या लेखणीचा हा नवीन विलास पाहून रसिकांस खासच आनंद होईल.

मानसचित्रें— ले० गंगाधर गाडगीळ; मनोहर ग्रंथमाला प्रकाशन; किंमत २॥ रु.

आयुष्यांत नेहमी भेटणाऱ्या व्यक्तींच्या जीवनांतील उत्कट भावनापूर्ण प्रसंग निवडून त्यांचें विश्लेषण करण्याचा लेखकाचा प्रयत्न आहे, व तो बऱ्याच अंशीं सिद्धीस गेला आहे.

लैंगिक भावनेनें जीवनांत प्रवेश केला असावा पण नवखेपणानें व अतृप्तीनें त्याबद्दल कुतूहलमिश्रित भय वाटावें, आणि त्यामुळे कसल्यातरी न्यूनत्वाची टोंचणी सारखी जीवाला लागून राहावी, असें अनेक व्यक्तींच्या आयुष्यांत होत असते; व अशा व्यक्तींच्या भावनांचें विश्लेषण हा श्री. गाडगीळ यांचा मोठा आवडता विषय आहे. 'चुकलेल्या प्रेमकथें'तील अच्युत, 'उतू गेलेलें दूध'मधील नाना व 'नवें जग'मधील कुसुम हीं व्यक्तिचित्रें चांगलीं साधलीं आहेत.

मुलांच्या मनोव्यापारावर आधारलेल्याहि कांही गोष्टी या संग्रहांत आहेत. त्यांपैकी 'बाई शाळा सोडून जातात' ही कथा फारच वास्तव व मनोज्ञ आहे. 'मोहन' व 'कशी गंमत केली' यांमध्ये बालजीवन प्रसंगांनी दाखविलें असलें तरी सूचकतेचा व बारकाव्याचा ( subtlety चा ) अधिक अवलंब केला असता तर त्या कथा जास्त परिणामकारक वठल्या असत्या.

श्री. गाडगीळ यांचा विनोद खेळकर व प्रसंगनिष्ठ आहे; ओढूनताणून विनोद करण्याचा ते हव्यास धरीत नाहीत ही अभिनंदनीय गोष्ट आहे.

आपल्या लेखनांत मधून मधून असलेला 'पोंचट स्वप्नाळूपणा व कृत्रिम भावना-विवशता' यांची जाणीव लेखकाला असल्यामुळे हे दोष पुढील कृतींतून नष्ट होतील अशी आशा करण्यास हरकत नाही.

चमकत्या चांदण्या ( लघुतम कथासंग्रह )— संपा० प्रा. भा. म. गोरे; किंमत दीड रुपया.

गेली सात आठ वर्षे मराठींत लघुतम कथा हा वाङ्मयप्रकार रूढ करण्याचा प्रा. गोरे यांचा प्रयत्न चालू आहे व त्याला कांहींसें यश आलें आहे हें या लघुतम कथांच्या दुसऱ्या संग्रहावरून मान्य केलें पाहिजे. लघुतम कथा ही विस्तारानें आटोपशीर असून अर्थपूर्ण कलाटणीनें विस्मय वाटायला लावील अशी असते. अशा बऱ्याच कथा या संग्रहांत आहेत. 'प्राध्यापकांची प्रकृति' मधील उपरोध सुंदर आहे.

खांडेकरांची 'निसर्ग आणि मनुष्य' व पेडगांवकर यांची 'खिडकींतून' या कथा उत्कृष्ट आहेत. मात्र पेडगांवकर यांनी ही कथा हरिन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांच्या कवितेवरून सुचली हें ऋण मान्य करावयास पाहिजे होतें.

अनुक्रमणिका

कांही कथा मात्र चमकत्या चांदण्या संज्ञेस पात्र नाहीत. त्यांच्यांत प्रतिभेची चमकहि नाही व चांदण्याची आल्हादकताहि नाही.

**अनामिका**— ले० प्रा. श्री. म. माटे; मूल्य ३ रु.

'उपेक्षितांच्या अंतरंगा'नंतर प्रा. माटे यांच्या ललितलेखनाचा हा दुसरा संग्रह प्रसिद्ध होत आहे. 'उपेक्षितांचें अंतरंग' या संग्रहाने ज्या अत्युच्च अपेक्षा निर्माण झाल्या होत्या त्या या संग्रहाने पूर्ण होत नाहीत. ठसकेबाज, अर्थवाही व अस्सल मराठी अशी भाषाशैली, जीवनाचा उत्कट अनुभव व समाजांतील विविध थरांचें दर्शन या सर्वांमुळे प्रा. माटे यांच्या लिखाणाला एक वैशिष्ट्य प्राप्त झालें आहे. 'अनामिकें'त केलेलें जीवनाचें चित्रण वास्तव आहे पण त्यामुळे समाजाच्या अंतरंगावर भेदक प्रकाश पडत नाही. प्रा. माटे यांनी जिवंत व्यक्तिचित्रें निर्माण केलीं आहेत. पण त्या व्यक्ति अशा खुरटलेल्या, उबगलेल्या कां आहेत हें सूचित करणारी मर्मभेदक शास्त्रीय दृष्टि 'अनामिकें'त नाही. या पिचलेल्या व्यक्तींबद्दल वाचकाला सहानुभूति वाटते. पण ज्या अन्यायी समाजरचनेमुळे या व्यक्ती पिचून गेल्या, त्या अन्यायाच्या जाणिवेने वाचक बेचैन होत नाही. 'सगाजीबोवा' हें व्यक्तिचित्र मात्र मन हलवून सोडतें. 'देवकाईची देवकी झाली' ही या संग्रहांतील सर्वोत्कृष्ट कथा आहे. स्वत्वाची जाणीव झालेल्या महारसमाजाचें एका लोककथेच्या साहाय्याने घडविलेलें हें दर्शन प्रा. माटे यांच्या लेखणीचें सामर्थ्य दाखविण्यास पुरेसें आहे.

'सगळीं माणसें जखम होऊन मेलीं असतीं तर' व 'देवाचे खरे लाडके कोण' या लेखांत जीवनांत काय कमतरता आहे व तें रसरशित, गतिमान व आल्हाददायक होण्याकरिता काय हवें होतें हें सांगितलें आहे. पण यांत तत्त्वज्ञान अगर चिंतन यापेक्षा स्वप्नरंजनच अधिक आहे असें वाटतें.

दोन कथा मात्र निराशाजनक आहेत. 'एका वृद्धाश्रमाची वाताहात' ही कथा लांबटपणामुळे कंटाळवाणी झाली आहे. 'मी आलें म्हणून सुटलास' या कथेंत राजकीय पार्श्वभूमि निष्कारणच वापरली आहे. शेवटची कलाटणी वाचकाला विस्मयचकित करण्या-ऐवजी अपेक्षाभंगच करते.

'पाहिला वसंत' यावरून प्रा. माटे यांची रसिकता व काव्यवृत्ति प्रत्ययास येतात. यांतील जीवनाच्या अंगोपांगांचें वर्णन फारच रेखीव व सुंदर आहे.

एकंदर भाषा भरघोस असली तरी वाचक 'फडत्कार' सारख्या शब्दांवर क्वचित् ठेचाळतो.

ग. दा. प्रधान

## संमिश्र—

**जनता साहित्य**— संपा० व्यंकटेश वकील; बॉम्बे बुक डेपो; किंमत १॥ रु.

१९४२ सालीं महात्माजींनी दिलेल्या 'चले जाव' या मंत्रामुळे हिंदी राष्ट्रांत नवा जोम निर्माण झाला. या नव्या आकांक्षा प्रामुख्याने या संग्रहांत व्यक्त झाल्या आहेत. ४२ च्या संग्रामांत पराक्रम गाजविणाऱ्या व्यक्तींच्या जीवनाभोंवतीं एक तेजोवलय निर्माण झालें होतें. त्यांच्या जीवनाच्या गूढतेबद्दल अनेकदा कुतूहल वाटत होतें. हें गूढ उकलून दाखवून एका वीराच्या ( भाई कोतवाल ) आयुष्याचें दर्शन साने गुरुजी यांनी उत्कृष्टपणें घडविलें आहे. उलट 'मृत्युंजय' या वकिलांच्या कथेंत हें गूढ कायम ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. माधव मनोहर यांनी केलेला लेडी ग्रेगरीच्या एकांकिकेचा अनुवादहि याच स्वरूपाचा आहे. आपलें राजकीय जीवन झपाट्याने बदलत असतांना अशा तऱ्हेचें अद्‍भुत (Romantic, चित्र रेखाटण्याने आपण योग्य तीं मूल्यें निर्माण करूं शकणार नाहीं असें वाटतें.

'पाताळयंत्र' या कथेंत चेस्टरटनच्या Man who was Thursday या कादंबरीप्रमाणे सर्व सी. आय. डी. एकमेकाला पकडतात ही घटना आहे.

मौलाना आझादांचें व्यक्तिचित्र सुंदर असून 'खेमी' ही एका दलित स्त्रीच्या जीवनावरील कथा वास्तव असून कलापूर्ण आहे. दोन कविताहि चांगल्या आहेत.

या संग्रहांतील गांधीजींचा 'जनतेचें साहित्य' हा लेख पुढील संग्रह काढतांना मार्गदर्शन ठरेल. आपल्या राष्ट्राच्या नव्या आकांक्षा या केवळ राजकीय नसून त्यांना सामाजिक अधिष्ठान आहे. न्याय आणि समतेवर उभारलेला नवसमाज निर्माण झाल्याशिवाय आपलें दडपलेलें राष्ट्र वर येऊं शकणार नाही हें आगामी संग्रहाच्या वेळीं लक्षांत ठेवणें अवश्य आहे.

**श्रीकरपंत**— ले· प्रा. वाघमारे; स्वयंप्रकाशनमाला, बडोदें.

हा विनोदी संग्रह आहे हें लेखकाने सांगून ठेवलें आहे ही वाचकांच्या दृष्टीने सोयीची गोष्ट आहे. चार विनोदी लेखक वाचून त्यांचें अनुकरण करायचेंच अशा निश्चयाने हें पुस्तक लिहिलें गेलें असावें. यांत 'दाजी'चा विक्षिप्तपणा नाही अगर 'चिमणरावा'चा भाबडेपणाहि नाहीं. इतर थोर लेखकांच्या पंक्तींत सोवळेंभांडें टाकण्याचा हा प्रयत्न जरा अधिकपणाचा वाटतो. भाषा बोजड आहे; व खोल विद्वत्तेमुळे क्लिष्टपणा कमालीचा आला आहे. मधून मधून पेरलेल्या कविता व अवतरणें वाचकाची पुरी दमछाक करतील.

**ग. रा. प्रधान**

## प्रो. जोग यांचें मतप्रदर्शन : 　ले० प्रा. श्री. म. माटे

प्रो. रा. श्री. जोग यांनी लिहिलेलें 'अर्वाचीन मराठी काव्य' हें समालोचनात्मक पुस्तक मीं परवां वाचलें. अर्वाचीन काव्यावर लिहिलेलें इतकें चांगलें पुस्तक मराठींत दुसरें नाहीं असें माझें मत आहे. मुंबई-मराठी-साहित्यसंघानें हें काम प्रो. जोग यांजवर सोपविलें हें फार बरें झालें. जोग यांचें आधुनिक काव्याचें वाचन फार सूक्ष्म आहे; आणि काव्याचें परीक्षण करावयास अवश्य असलेली पात्रता तर व्यवसायामुळे त्यांच्या ठिकाणीं केव्हाच उत्पन्न झालेली आहे. पुस्तक वाचीत असतांना आपण एका भल्या माणसाच्या संगतींत वाटचाल करीत आहों असें वाटतें. जोग कोणाला दुखवणार नाहींत; पण मुद्दा मात्र सोडणार नाहीत. टीका करावयाची ती करतीलच; पण ज्याच्यावर ती होत असेल त्यास फार झालें तर वरमावयास लावतील इतकेंच काय तें. आपले सारे गुणदोष या गृहस्थाला उत्तम कळले आहेत ही जाणीव त्याला प्राप्त झाल्यामुळे प्रत्युत्तर करावयाची उत्पन्न झालेली ऊर्मि तो खचितच दाबून धरील. एखाद्या अत्युत्साही, आग्रही आणि कजाग टीकाकाराच्या तावडींत आपण सापडलों आहों असें दिसून आलें तर कवीला थोडा धीरच येतो, कारण प्रत्युत्तराला अवश्य असलेली भूमि टीकाकारच त्याला प्राप्त करून देतो. पण प्रो. जोगांनी ज्यांच्यावर टीका केली आहे त्यांना हा फायदा कधींहि मिळावयाचा नाहीं. आपलीं शरीरींच्या सारीं सुलक्षणें या टीकाकारानें ओळखलेलीं आहेत आणि आर्द्रन्यायबुद्धीनें त्यांचा उच्चार यानें केला आहे; येवढेंच नव्हे तर आपल्या अवलक्षणाचें दर्शनहि यानें फार कुशलतेनें, सौम्यपणानें पण निःस्पृहतेनें केलें आहे हें पटल्यामुळे विषयभूत कवि आपल्या ठिकाणीं चूपच होऊन राहील. टीकेचा तराजू इतक्या काटेतोलपणानें वापरणारा टीकाकार आपल्याला लाभला म्हणून कवींनी आनंदच मानला पाहिजे.

कोणाकोणाचें असें मत आहे कीं प्रो. जोग हे जास्त सौम्य आहेत. अवश्य तेथे ते कडाडून बोलत नाहींत; हळुवारपणामुळे त्यांच्या टीकेचे कंगोरे मुडपल्यासारखे झाले आहेत. मला असें बिलकुल वाटत नाहीं. पुस्तक वाचीत असतांना हा आक्षेप माझ्या ध्यानांत सारखा जागा होता. पण तो अमुक ठिकाणीं लागू पडतो असें मला मुळीच वाटलें नाहीं. टीका करावयाची किंवा अभिप्राय सांगावयाचा तो जहरीपणानें किंवा दंश करून सांगितला पाहिजे ही अपेक्षा सामान्य टीकावाङ्मयांत युक्त असेल. पण या पुस्तकाची भूमिका उच्च आहे. ज्यांच्या वाङ्मयासंबंधानें आपण लिहीत आहों ते लोक अधिकारसंपन्न आहेत, आणि आपणहि आपल्या पदवीची गुरुता संभाळूनच बोललें पाहिजे, ही दुहेरी जाणीव प्रो. जोग यांच्या ठिकाणीं जागृत आहे. प्रौढ, भारदस्त, विवेकशील आणि केवळ मर्मग्राही टीकाकाराला हीच भूमिका उचित आहे.

मतें स्पष्ट दिलीं आहेत कीं नाहींत हें पुस्तकांतूनच पहावयास हवें. कांहीं उदाहरणें पहा:—"कलेपेक्षा बोधाची दृष्टि अधिक स्वीकारल्यानें कवींपेक्षा प्रेषितांचीच भूमिका काव्यविहारींनीं अधिक प्रमाणांत केली आहे. भाषेमध्यें ओघ असला तरी मनोवेधकता कमी. प्रसाद व ओज हे गुण असले तरी लालित्याचा प्रत्यय येत नाहीं." श्री. सोपानदेव यांच्यासंबंधानें ते म्हणतात; "ते महाराष्ट्राला परिचित झाले असले तर त्याचें श्रेय त्यांच्या काव्यगुणांस देण्यापेक्षा त्यांच्या काव्यगायनांतील नैपुण्याला देणें उचित होईल." श्री. के. ना. काळे यांचें "गज्जल, काव्यरचनेवर विशेष प्रभुत्व नसल्यामुळे, अशुद्ध उतरत व एकंदर सारी रचनाच

बोजड उतरे : त्यामुळे विचार चांगला किंवा नवीन असूनहि त्याची मांडणी मात्र ठोकळ्यांत घातल्यासारखी होई." स्वा. सावरकरांच्याविषयीः—विनोद आणि नर्मशृंगारही गांभीर्यजड झाला आहे; यांच्या कवितेंत प्रसादगुणाचें अस्तित्व बहुतांशीं अभावानेच जाणवतें. साध्या गोष्टीहि त्यांच्या लेखणींतून क्लिष्ट व गंभीर होऊनच बाहेर पडाव्या असा विधिसंकेतच दिसतो." श्री. पु. य. देशपांडे "यांच्याजवळ भावना व विचार असूनहि त्यांना काव्यरूप देण्यास रचनाकौशल्याचें किमान प्रमाण असल्यावांचून भागत नाही याचा प्रत्यय मात्र त्यांच्या काव्यामुळे येतो." "सान्त-अनंत, मूर्त-अमूर्त, निर्गुण-सगुण या शब्दांची पेरणी मधून मधून होत असल्याने उदात्ततेचा आभासहि अनिलांच्या या कवितेंतून होतो." "काव्यांतहि वास्तवतेस महत्त्व देणाऱ्या या काळांत टेकाडे मागे पडावे ही गोष्ट युगप्रवृत्तीस धरूनच झाली." "व्यंजना या अर्थाने बेहेरे यांच्या काव्यांत ध्वनि असतो असें म्हणणें म्हणजे वस्तुस्थितीचा संपूर्ण विपर्यास आहे......काव्यसौंदर्यापेक्षा श्रमसौंदर्य श्रेष्ठ असल्याची श्री. बेहेरे यांची जी समजूत आहे ती एका अर्थाने कवितेंत सर्वत्र प्रतिबिंबित झालेली दिसते." "या राष्ट्रीय प्रकारच्या काव्यास अनुरूप असा शब्दसंग्रह व लेखनाची युक्ति अज्ञातवासी यांनी गोविंदाग्रजांपासून उचललेली दिसते." "मनोरमाबाई गेल्या आणि मंडळ पोरकें झालें असें पटवर्धनांनी म्हटलें आहे त्याला अर्थ व्यावहारिक अधिक आहे कीं काव्यविषयक आहे तें स्पष्ट नाही." "कांही अनाकलनीय, अगाध, अचिंत्य असें पाहण्याचा यशवंतांचा प्रयत्न आहे. यापाठीमागे ते खरोखर लागल्यास आजवर त्यांच्या काव्यास नसलेला गूढतेचा शाप मात्र लागण्याची भीति वाटते...क्रांतीला आवाहनहि त्यांनी सुरू केलें आहे. पण हा जिव्हाळा मूळचा आहे असें वाटत नाही."— प्रो. जोग यांनी प्रकट केलेलीं हीं मतें मला मान्य आहेत म्हणून मीं तीं उद्धृत केलीं आहेत असें नव्हे; पण प्रो. जोग हे आपलें मत खडखडीतपणाने सांगत नाहीत, फार सौम्यपणाने सांगतात किंवा "तीर्थरूप पद्धतीने" गोंजारून ते पुढे जातात, या कांही लोकांनी घेतलेल्या आक्षेपाला कितीशी जागा या पुस्तकांत सांपडते हें दाखविण्यासाठीच मीं वरील मतें उद्धृत केलीं आहेत. वर ज्या कवींचीं नांवें आलेलीं आहेत त्यांपैकी एकहि कवि प्रो. जोग यांच्या लिहिण्यावर वरील आक्षेप घेईल असें मला वाटत नाही.

परंतु प्रो. जोग हे आपलें मत कडकडीतपणाने सांगतात कीं नाही याचा निकालच करावयाचा असला तर कै. माधवराव पटवर्धन यांच्या 'विरहतरंग' या काव्याचें परीक्षण करतांना त्यांनी विरहतरंग आणि मेघदूत यांची जी तुलना केली आहे ती अवश्य वाचावी. ती सर्व तुलना या ठिकाणीं उद्धृत करणें अशक्य आहे. पण एकच शेलकें वाक्य पाहा. "मेघदूतापेक्षा विरहतरंग हें काव्य अनेक बाबतींत उणें तर नाहीच पण सरस आहे असें म्हटलें तर तें अयोग्य होणार नाही." हें वाक्य फार जणांनां लागलें आहे. पण मग त्याचा अर्थ असा होतो की प्रो. जोग यांनी आपलें मत खडखडितपणें सांगितलें आहे. कै. तांबे यांच्या कवितेविषयीं लिहितांना ते म्हणतात, "तांब्यांच्या प्रेमाचें वातावरण बहुतांशीं जुन्या प्रेमाचें आहे. इंग्रजी पद्धतीचें नाही. निदान पन्नास वर्षांपूर्वीचें, जेव्हा स्त्रिया कशिदा काढीत असत त्या वेळचें आहे. त्यांत आजतागायतपणा नाही." "बाळकृष्ण अनंत भिडे यांना कवि म्हणून विशेष यश न मिळालें तरी काव्याचा मार्मिक टीकाकार होण्याइतकें काव्यरहस्य मात्र त्यांना समजलें हें कांही व्यर्थ गेलें नाही." "लक्ष्मणशास्त्री लेले यांची भावनाच अशी नसे की काव्य हें सामान्य जनाकरता

अनुक्रमणिका

लिहावयाचें आहे. त्यांच्याकरता फार झाल्यास टीपा द्याव्यात. पण शुद्ध मराठींत लिहावें अशी त्यांची भावना नसे." या दोनहि परिच्छेदांतील अभिप्राय वाचल्यानंतर जोग यांच्या मतप्रदर्शनावर कोणीं कोणीं घेतलेला आक्षेप अगदी व्यर्थ आहे हें सहज दिसून येईल. टीका-विषय कवि अन्याय केल्याने मरत नाही तर न्याय केल्यानेच मरतो हें जोग यांनी फार चांगलें ओळखलेलें दिसतें !

तथापि आलेल्या आक्षेपाचें खंडन जरी अशा रीतीने होत असलें तरी असें म्हणणें भागच आहे की या तीनशें सव्वातीनशें पानांच्या समालोचनपर पुस्तकांत अगदी नवें वाटेल असें कांही सांपडत नाही. कदाचित् याचें कारण असेंहि असूं शकेल की आधुनिक काव्याचा आवाकाच फार लहान असेल, आधुनिक कवींच्या प्रतिभेची कूसच इतकीशी बलशाली नसेल, किंवा अनेक टीकाकारांनी आतापर्यंत या काव्यांचा परामर्श हस्तन्द्वेने घेऊनहि टाकला असेल. सिंहावलोकन हें शेवटचें प्रकरण मात्र अत्यंत वाचनीय झालेलें आहे. आधुनिक काव्याचा अभ्यास ज्या प्रौढ विद्यार्थ्यांना करावयाचा आहे त्यांनी हें पुस्तक अनेकदा वाचलें पाहिजे, त्यांतील बारीक बारीक सुश्लिष्ट विधानांच्या पोटमख्या नीट तपासून पाहिल्या पाहिजेत आणि न्यायाचा कांटा हातांत धरलेला असला तरी मखमलींत दडविलेला बिचवा किंवा मुठींत लपविलेलीं वाघनखें प्रसंगविशेषीं कशीं चालवावीं लागतात हेंहि बारकाईने समजून घेतलें पाहिजे.

---

## साभार स्वीकार

### बालवाङ्मय

१ महिपाल—ले० पं. महादेवशास्त्री जोशी; प्रका० वि. ह. दामले, नवीन किताबखाना; मूल्य दहा आणे.

२ उद्धार—ले० पं. महादेवशास्त्री जोशी; प्रका० वि. ह. दामले, नवीन किताबखाना; मूल्य सहा आणे.

३ पुनर्जन्म—ले० पं. महादेवशास्त्री जोशी; प्रका० वि. ह. दामले, नवीन किताबखाना, पुणें २; मूल्य आठ आणे.

४ सुदर्शन—ले० पं. महादेवशास्त्री जोशी; प्रका० य. गो. जोशी, पुणें २; मूल्य आठ आणे.

५ वैशाली—ले० पं. महादेवशास्त्री जोशी; प्रका० य. गो. जोशी, पुणें २; मूल्य सहा आणे.

६ बहुरंगी करमणूक—संग्राहक-रा. त्र्यं. रानडे; मङ्गल साहित्य प्रकाशन, पुणें ४; मूल्य सव्वा रुपाया.

---

अनुक्रमणिका

# संपादकीय

## पहिली माझी—

म. सा. परिषदेच्या कार्यकारी मंडळाने 'पत्रिका'-संपादनाची जबाबदारी मे महिन्यांत माझ्याकडे सोपविली; आणि मीं ती स्वीकारली. ही कामगिरी स्वीकारतांना माझ्या मनाची अवस्था भारावल्यासारखी झाली आहे. डॉ. माधवराव पटवर्धन, म. म. प्रो. दत्तोपंत पोतदार, प्रो. रा. श्री. जोग, श्री. के. नारायण काळे, श्री. मो. ज्ञा. शहाणे, अशा विद्वद्वर्यांनी आपल्या कर्तृत्वाने 'पत्रिके'ला जो मान मिळवून दिला आहे तो आपणांस कसा राखतां येईल याची शंका वाटते.

तथापि परिषदेचे (आणि ओघानेच पत्रिकेचे) हितैषी आपलें साहाय्य पूर्वीइतक्याच निष्ठेने देत राहतील ह्या भरवशाने मीं ह्या कामगिरीस मान तुकविली आहे. संपादक हा श्रेयाचा धनी असला तरी श्रेयाचे खरेखुरे वांटेकरी लेखकच असतात. अशा रीतीने श्रेयाची वांटणी केली तर संपादकाच्या पदरांत 'निमित्त' होण्याचें तेवढें श्रेय उरतें. संपादक व्युत्पन्न आणि लेखणीचा खंबीर असला तरी एकटा काही सर्व अंक सजवूं शकत नाही. आणि तें युक्तहि नसतें. मी तसा व्यासंगी, व्युत्पन्न आणि बहुढंगी लेखणीचा खंबीर नाहीं. पण पत्रिके-विषयी चाहत्यांच्या ठिकाणीं जें ममत्व आहे त्यावर माझी भिस्त आहे.

पत्रिकेच्या स्वरूपांत अधिक रमणीयता यावी अशी अपेक्षा बोलून दाखविण्यांत आली आहे. पत्रिका ललितप्रकृति नाही ही गोष्ट ह्या अपेक्षेच्या बुडाशीं आहे. तिच्या स्वरूपांत तसा फरक करावा कीं नाही हा मुद्दा बराच विवाद्य आहे. ललितापेक्षा चर्चात्मक, शास्त्रीय, संशोधनात्मक साहित्याकडेच पत्रिकेचें मुख वळलेलें असावें असें बहुमत दिसतें. हितैषी मंडळींबरोबर विचारविनिमय केला असतां त्यांनी ह्या दृष्टीने बऱ्याच उपयुक्त सूचना करून माझा मार्ग प्रकाशित केला आहे. त्या प्रकाशानुरोधाने चालण्याचा मी यथाशक्ति प्रयत्न करीन. पण सूचना करणाऱ्यांनी त्या घडवून आणण्याची स्वार्गे तयारी दाखविल्यास माझ्या शक्तीचा थिटेपणा व्यक्त होणार नाही आणि पत्रिकेला पूर्णता आणण्याचे कामीं आपल्या सूचना सार्थकीं लागल्याचें त्यांना समाधान लाभेल.

परीक्षणें हें पत्रिकेचें मुख्य वैशिष्ट्य असून त्याला बाध येऊं नये असा सर्वांचाच अभिप्राय आहे. नाशिकच्या 'स्वदेश' साप्ताहिकांत पत्रिकेच्या गेल्या अंकावर अभिप्राय देतांना त्यांत परीक्षणें नसल्याबद्दल दिलगिरी व्यक्त करण्यांत आली होती. बाकी, तसें पाहिलें तर, तो अंक आमूलाग्र 'परीक्षण-अंक'च होता. तरी पण, एक गोष्ट सत्य की पुस्तक-परीक्षणांचें वैशिष्ट्य हें बहुजनसंमत आहे, आणि तें तसेंच चालू राहावें म्हणून आणि पत्रिकेला अपेक्षित स्वरूप यावें म्हणून सर्व ऋणानुबंधी, त्याचप्रमाणें अभिमानी लेखकांना, लोभ अखंड ठेवण्या-विषयी माझी विनंती आहे.

## म. सा. संमेलन

महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें ३१ वें अधिवेशन दक्षिण हैदराबाद येथे मे महिन्याच्या अखेरीस यशस्वीरीत्या पार पडलें. संमेलनोत्तर प्रसिद्ध झालेल्या बातमीपत्रांवरून संमेलनाचें यशोमापन ज्याचें त्याला करतां आलें असेल. तथापि कांहींनी ह्या अधिवेशनाच्या पदरांत

यशाचें माप पडलें नाही असें मत व्यक्त केलें आहे. मता-मतांतील ही तफावत अर्थातच यश मापावयाच्या परिमाणांत आहे.

गतवर्षीच्या संमेलनांत महाराष्ट्राच्या एकीकरणाचा प्रश्न सर्व सामर्थ्यानें धसास लागला. त्या संमेलनाबद्दल पुष्कळांनी असमाधानाचे उद्‌गार काढले होतेच. पण परिणामाच्या दृष्टीने पाहावयाचें झाल्यास त्या प्रश्नाला चालना मिळून आज त्याचा प्रपंच जो चालू झाला आहे तो लक्षांत घेतला तर बेळगांवचें संमेलन यशस्वीच झालें असें आज त्या वेळचे असमाधानी लोकहि म्हणतील, असें वाटतें. संयुक्त महाराष्ट्र निर्माण करण्यासंबंधीच्या त्या संमेलनांतील ठरावांतूनच

संयुक्त महाराष्ट्र परिषद्

अस्तित्वांत आली असून तिच्या जळगांव येथील अधिवेशनाचा अहवाल प्रसिद्ध झाला आहे.

संयुक्त महाराष्ट्र निर्माण करण्याच्या मागणीला चारी दिशांतून पाठिंबा मिळत आहे. तरी पण, कार्यकारिणींचें अधिष्ठान बलशाली आहे आणि तिला अखिल मराठियांचा पाठिंबा आहे हें सिद्ध होण्यासाठी ह्या परिषदेला एक लाख सदस्य मिळाले पाहिजेत. सदस्यांचें हें संख्याबल तांतडीने लाभावें अशी श्री. शंकरराव देव ह्यांनी जाहीरपणें मागणी केली असून नेत्यांना सामर्थ्य प्राप्त करून देणें हें सश्रद्ध जनतेचें कर्तव्य असल्यामुळे श्री. शंकरराव देव ह्यांची ही मागणी पुरी करण्यास सर्व मराठियांनी तत्परतेने धाव घेतली पाहिजे. कार्योद्युक्तांच्या मुखाने बृहन्महाराष्ट्र बोलत आहे हें सिद्ध करण्यास आता मुळीच विलंब न लावतां सर्वांनी सदस्य व्हावें.

उपरोक्त जळगांव-अधिवेशनाच्या अहवालाकडे हैदराबाद-संमेलनांत लक्ष देण्यांत आलें आहे हें संमत झालेल्या ठरावावरून दिसून येईलच.

× × ×

चालू सालच्या संमेलनाचा सारा रोख मराठवाड्यांत, किंबहुना निजामशाहींत, मराठी-भाषिकांच्या होत असलेल्या गळचेपीकडे होता. त्यासंबंधांत संमत झालेला ठराव लक्षांत घेण्या-सारखा आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीचा उच्चार बेळगांव संमेलनांत झाल्याबरोबर अन्य जोखडाखाली अडकलेल्या मराठवाड्याने आपल्या अवस्थेकडे अवधान देण्यास संमेलनाला हाक द्यावी हें क्रमप्राप्तच होतें आणि त्या हाकेसरशीं जाणें हें परिषदेचें कर्तव्यच होतें. अर्थात् बहुतेक भर त्या परिस्थितीची विचक्षणा करणें आणि त्या परिस्थितीशीं कशी टक्कर द्यायची ह्या-संबंधी संकल्पात्मक घोषणा करणें ह्यांवरच असणार. मायभाषेची मुस्कटदाबी झाल्यामुळे तिच्या संतानाची अंतर्यामीं कशी तडफड होत आहे ती अनुभवायला मिळाली आणि त्या तडफडीवर उपाय योजतांना आम्ही तुमच्या पाठीशीं आहों, तुम्हांला साहाय्य करायला आम्ही बद्धपरिकर आहोंत असा अध्यक्षांनी व परिषदेने निर्वाळा दिला आहे. ह्या गोष्टी लक्षांत घेतल्या म्हणजे संमेलनाचें उद्दिष्ट सफळ झालें आहे असेंच विवेकी लोक म्हणतील. संमेलनाचें स्वरूप द्विविध असतें. संमेलनामध्ये सोहळ्याबरोबर कार्यशीलताहि प्रकट व्हायला हवी; आणि गेल्या सालापासून ती होत आहे. तेव्हा, संमेलन यशस्वी झालें असें म्हणण्यांत चूक नाही.

× × ×

सोहळा ह्या दृष्टीने विचार करतांना, कांही नामवंत साहित्यिकांची अनुपस्थिति लक्षांत आल्याशिवाय राहिली नाही. विशेष म्हणजे परिषदेचे कार्याध्यक्ष प्रो. श्री. म. माटे ह्यांनी संमेलनापूर्वी आमंत्रणपत्रिका काढून सर्व साहित्यिकांना हैदराबादेस येण्याविषयी विनंति केली

असतांहि तिचा अनुकार झालेला दिसला नाही. तथापि साहित्यिकांनी बुद्ध्या असें केलें असें म्हणण्यानें त्यांच्याकडे क्षुद्रपणा येतो. तो क्षुद्रपणा ते कां घेतील ? तेव्हां तसा कांही प्रकार नव्हता, असेंच म्हणायला हवें. संमेलन झालें महाराष्ट्राच्या पूर्वसीमेवर; म्हणूनच पश्चिम-किनाऱ्यावरच्या नामवंत साहित्यिकांपैकीं बरेच जणांना तेथवर दौड मारणें शक्य झालें नसावें. मराठी साहित्यिकांची सामान्यपणें मासिक प्राप्ति लक्षांत घेतां बहुतेकांच्या बाबतींत ती सारी आणि थोड्यांच्या बाबतींत ती निम्मीशिम्मी ह्या सोहळ्याप्रीत्यर्थ खर्च होणार होती. संमेलनास जाण्याचे आधीपासून बेत करणारे कितीक साहित्यिक ऐनवेळीं ज्या कारणांनी गळले त्यांत हेंहि एक कारण असावें आणि हें 'अगदीच क्षुल्लक' म्हणवत नाही.

हैदराबादच्या राजकीय परिस्थितीमुळे उत्पन्न झालेल्या दंगलमय परिस्थितीच्या वार्ता ऐकूनहि पुष्कळांनी उचललेलें पाऊल मागे घेतलें असण्याचा कयास आहे.

कारणें खरीं होतीं; आणि त्यामुळे कांहींसें वैगुण्य भासणें अपरिहार्य होतें.

× × ×

राजकारणाकडे झुकलेल्या विषयांना प्राधान्य आल्यामुळे संमेलनाचें साहित्यविषयक कार्य उपेक्षिलें जात आहे, ही गोष्ट नाकबूल करतां येणार नाही. गतवर्षीच्या ललितवाङ्मय विभागाच्या अध्यक्षांनी वाङ्मयाकडे संपूर्णपणें पाठ फिरवूनच भाषण केलें. यंदा तसें घडलें नाही. प्रा. न. र. फाटक ह्यांचें अध्यक्षीय भाषण (परिषदेकडे उपलब्ध आहे) वाङ्मयविषयक अनेक मुद्द्यांच्या आलोडनानें समृद्ध आहे. 'साहित्यिक' ही पदवी क्षुद्र नाही, साहित्याचें सामर्थ्य अगाध आहे, हें सुद्धा त्यांनी आपल्या भाषणांत गळा खुला करून सांगितलें आहे—(पृ. २०).

संमेलनाच्या कार्यक्रमांत " साहित्यिक अप्रामाणिक आहेत काय " ह्या विषयावर चर्चा ठेविली होती. पण तींमध्ये ज्यांनी भाषणें केलीं त्यांना आगाऊ वर्दी दिली गेली नव्हती. आयत्या वेळीं उभे करण्यांत आलेले वक्ते कांही मौल्यवान् विचार ऐकवितीलच ह्याचा काय नेम ? पूर्वीच्या वक्त्यांवर गुजराण करण्याकडे पुढीलांची प्रवृत्ति होते. आणि विषयाची चर्चा होण्यापेक्षा 'ऐनवेळच्या' विषयावर वक्त्यांचीच परीक्षा घेतली जाते. चर्चेचा विषय पुरेसा आधी मुक्रर करून, त्या विषयावर अधिकारवाणीने बोलूं शकतील अशा साहित्यिकांची आधी योजना करण्यांत आली पाहिजे आणि ते संमेलनाला उपस्थित होऊं शकतील अशी व्यवस्थाहि करायला हवी.

ह्या चर्चेप्रमाणे आणखी एक वाङ्मयविषयक गोष्ट घडली. ती म्हणजे प्रा. माटे ह्यांचें व्याख्यान. मराठीच्या अभ्यासांत कोणकोणते प्रश्न उद्भवतात ते त्यांनी स्वानुभवावरून सांगितले आणि त्यांचा कसा छडा लावायला पाहिजे ह्याबद्दल धावतें दिग्दर्शन केलें. हें भाषण बहुजनांना फारच उपयुक्त होतें.

उपरिनिर्दिष्ट बाबी 'साहित्य' संमेलनाच्या दृष्टीने किती मोजक्या आहेत ! वाङ्मय-प्रपंचांत अनेक तात्त्विक नि प्रासंगिक अडचणी असतात, काळ कापत जातांना त्या पुढे ठाकतात. आणि वेळच्या वेळीं त्यांचा ऊहापोह होणें जरूर असतें. चालकांनी तशी आंखणी करावयास हवी. संयुक्त महाराष्ट्र निर्मितीच्या प्रश्नाला एक दिवस देऊन, इतर वाङ्मय-विषयक बाबींकडे लक्ष देणें जसें बेळगांवास शक्य झालें असतें, तसेंच यंदा निजामप्रांतीय मराठियांच्या परिस्थितीबाबत एक सबंध दिवस राखून बाकीच्या दिवसांचा विनियोग इतर सभांसाठी करणें अवघड नव्हतें. पुढे तरी, अनवधान होतां कामा नये.

म. सा. परिषदेपुढील कार्य आणि संकल्प ह्या संबंधाची माहिती प्रा. माटे ह्यांनी एका भाषणांत मोठ्या उत्कटतेने सांगितली. सर्वसामान्य जनता स्वयंस्फूर्तीने माहिती करून घेण्या-इतकी जागरूक नसते आणि अज्ञानाने गैरसमजाला मात्र वाव मिळतो. म्हणून कार्य-कर्त्यांनी असें निवेदन आवर्जून करायला हवें. तशांत कार्याध्यक्षपदावरून बोलणारा बापू-साहेबांसारखा झपाटणारा वक्ता. आपल्या विचारांनी त्यांनी श्रोत्यांना भारून टाकलें असल्यास नवल नाही.

## रवीन्द्रस्मृति

ता. ७ मे हा रवीन्द्रनाथ टागोरांचा जन्मदिन. खुद्द ह्या जयंतीला नाही, पण तत्पूर्वी दोनतीन दिवस, श्री. त्र्यं. र. देवगिरीकर यांनी मूळ बंगालीवरून अनुवादिलेल्या 'गीतांजली' चा प्रकाशनसमारंभ झाला. ह्या मराठी गीतांजलीस आचार्य भागवत यांची प्रस्तावना आहे. त्या प्रकाशनसमारंभांतहि त्यांचेंच प्रमुख वक्ते म्हणून रवीन्द्रमहतीसंबंधी उत्स्फूर्त व्याख्यान झालें.

महाराष्ट्रांत रवीन्द्रनाथांबद्दल नाना प्रकारचे गैरसमज बद्धमूल झालेले आढळतात. त्यांच्या प्रतिभेची भव्यता संपूर्णपणें आकलन होण्यासाठी त्या साहित्याचें बंगाली स्वरूपच परिचित करून घेतलें पाहिजे. मूळ बंगालीवरून रवीन्द्र-साहित्याचा अभ्यास ज्या प्रमाणांत महाराष्ट्रांत वाढत जाईल त्या प्रमाणांत रवीन्द्रनाथांचें विभूतिमत्व महाराष्ट्राला मान्य होत जाईल असा आचार्यांचा अभिप्राय आहे. प्रस्तावनेंतील ह्या व अशाच इतर मुद्द्यांचें त्यांनी व्याख्यानांत वितरण केलें.

'रवीन्द्रनाथांच्या साहित्यांत असें नवीन काय आहे की जें भारतीय तत्त्वज्ञानांत व संतवाङ्मयांत उत्कटतेने येऊन गेलं नाही?' अशा प्रश्नाने रवीन्द्रांना हिणविण्यांत येतें. ह्या हिणवण्यालाहि त्यांनी समर्पक उत्तर दिलें. सर्वांशी नवीन असें कांहीच नसतें. मूळ सिद्धान्त व सत्य, हें तेंच असतें. व कालौघाबरोबर त्याचा विकास होत असतो. पण मधून मधून त्याला मलिनता येते, जीवनकलहाच्या धुमाळींत त्याकडे दुर्लक्ष होतें, आधिभौतिकाच्या हव्यासांत त्याचा विसर पडतो. अशा वेळीं आडमार्गाला लागलेली गाडी रुळावर आणण्यासाठी, जगाच्या कल्याणाची काळजी वाहणारा कोणी तरी महात्मा अवतीर्ण होतो. त्याला त्या सिद्धान्ताची व त्या सत्याची नव्याने प्रचीति येते आणि अनुभूतीच्या जिव्हाळ्याने त्यांचा तो उद्गाता होतो. त्याच्या ठायीं त्या सत्य-सिद्धान्तांचा उगम होतो, प्रकर्ष होतो आणि त्याच्या व्यक्ति-मत्वाने त्यांना नवीन ओज प्राप्त होतें. 'रवीन्द्रनाथांच्या जीवनदर्शनांत औपनिषद् अद्वैताचें ज्ञान, मध्ययुगीन वैष्णव संतांचें भक्तिप्रेम आणि आधुनिक युगांतील सामाजिक आदर्श प्रत्यक्ष व्यवहारात सिद्ध करण्यासाठी लागणारी कर्मप्रवृत्ति ह्या त्रिविध प्रवाहांचा मनोहर संगम झाला आहे.' अशा आशयाचें त्यांनी आक्षेपकांना उत्तर दिलें.

* * *

ह्याच अनुसंधानाने रवीन्द्रनाथांच्या संस्मरणाचा दुसरा एक सुयोग इथे नमूद करायला हवा.

डाक्का विद्यापीठांतील प्राध्यापक सुशीलकुमार दे ह्यांनी परिषदेला भेट दिली. त्या वेळीं त्यांना विनंती केल्यावरून त्यांनी ता. २० जून रोजीं दिलेल्या व्याख्यानांत वंगीय साहित्या-संबंधी धावतें समालोचन करतांना कांही उद्बोधक माहिती सांगितली. एकाच बैठकींत

अनुक्रमणिका

समालोचन उरकावयाचें असल्यामुळे विमान-टप्प्यानेच जाण्याशिवाय त्यांना गत्यंतर नव्हतें. आधुनिक बंगाली वाङ्मयाचे निर्माते म्हणून मायकेल मधुसूदन दत्त आणि नंतर बंकिमचंद्र ह्यांच्या वाङ्मय-कर्तृत्वाचे विशेष सांगून ते रवीन्द्रनाथांकडे वळले. आचार्यांच्या प्रस्तावनेंत आलेल्या चरित्रविषयक ठळक ठळक गोष्टी दे यांच्या भाषणांतहि होत्या. पण त्याशिवाय, म्हणजे रवीन्द्रनाथांच्या उत्तर आयुष्याबद्दल त्यांनीं जें सांगितलें त्यानें त्या महाकवीच्या व्यक्तिजीवनावर विशेष प्रकाश पडतो.

ह्या कविसम्राटाने ऐन उमेदींत पूर्वीच्या पिढींतील नवयुगप्रवर्तक **मधुसूदन दत्त** ह्यांच्यावर कडक टीका केलेली वाचून विस्मय वाटतो. **दत्तांचें** कर्तृत्व टागोरांच्या अभिरुचीला मानवलें नाही ह्याचें कारण ह्या दोघांच्या पिंडप्रकृतींतला भिन्नपणा होय. टागोरांची प्रकृति मुख्यत्वें भावकवीची (आचार्य भागवतांच्या भाषेंत "त्यांच्या प्रतिभेचें प्रमुख स्वरूप गानमयच आहे"). प्रदीर्घ कथाकाव्याची रचना त्यांच्या स्वभावाला न साधणारी. टागोरांच्या अलौकिकतेंत तदुत्तरचे बहुतेक साहित्यिक गडप झाले. महान् तेजोगोलाभोवती दुसऱ्या तेजोगोलांनी भ्रमण करावें किंवा सूर्यप्रकाशांत नक्षत्रांचें तेज ज्याप्रमाणे लोपून जावें तसाच प्रकार नंतरच्या साहित्यिकांचा झाला आहे. रवीन्द्रांच्या तेजोवलयांतून ते सुटून अलग होऊंच शकत नाहीत; न कळत ते त्यांच्या अनुसरणांतच गोवले जातात.

इतकेंच नव्हे तर खुद्द हा महाकवि स्वतःच प्रस्थापित केलेल्या अभिजातपणाची पुढे पुढे नक्कल करूं लागला, आणि नवोदितांच्या पद्धतीहि आपणाला अगम्य नाहीत हें सिद्ध करण्याच्या गुप्त ईर्षेने तसल्या पद्धति व शैली देखील त्यांनी हाताळलेल्या दिसतात. दीर्घायुष्य हा ह्या दृष्टीने शाप होय. कर्तबगारीचें अत्युच्च शिखर गांठल्यावर साहित्यिक थांबला नाही तर तो घसरगुंडीला लागण्याचा धोका उद्भवतो. 'दिसामाजि कांही तरी तें लिहावें' असा त्यांचा सवयीने स्वभावच बनला होता. त्याशिवाय त्यांना चैनच पडत नसे. शेवटच्या दहाबारा वर्षांतलें त्यांचें लेखन अशा स्वरूपांची केवळ 'कामाठी' वाटतें. "थांबला तो संपला" हें खरें असलें तरी कुठे थांबावें हें देखील कळायला हवें. आपण संपलों नाहीं हें दाखविण्याच्या गुप्त प्रेरणेने मनुष्य जर लेखणी राबवीत राहिला तर तो 'थांबला' नसूनहि 'संपला'सा होतो.

दुसरें असें की आपलें व्हावें तितकें चीज होत नाही, कौतुक होत नाही, मानायला हवें तितकें लोक आपल्याला मानत नाहीत ही असंतोषाची भावनाहि त्यांच्या अंतरीं बळावत चालली होती. [मुंबईस रॉयल ऑपेरा हाऊसमध्ये त्यांचा सन्मान करण्यांत आला होता, त्या प्रसंगीं कविवर्यांनी आपल्या भाषणाची सुरुवात ह्या असंतोषाच्या कटु उद्गारांनीच केली असें सांगतात]. लोक आपणाला विसरून जातील कीं काय ह्या भयशंकेनेच त्यांच्या लेखणीने विसावा घेतला नसावा. आणि ह्या भावनेने पछाडलेल्या ह्या शांतिनिकेतनाच्या रहिवाशाला वार्धक्यांत शान्तिसुखाचा लाभ घडला नाही. नेहमीच हा आत्मा अशान्त राहिला. कांही दिवस इथे राहा, तिथे राहा, इथे आश्रम बांध, तिथे मंदिर उभार, हें निवासस्थान थाट, हा जो त्यांच्या उत्तर आयुष्यांत वारंवार थरेपालट होत गेलेला दिसतो त्याची कारणमीमांसा ह्या मानसिक अस्थिरतेंत आहे.

**प्रा. दे** हे टागोरांच्या निकटवर्ती जनांपैकी होत. तेव्हा त्यांनी केलेलें हें निवेदन जसें नवीन तसेंच उद्बोधक नाही काय !

---

# महाराष्ट्र साहित्य संमेलन ३१ वें, हैद्राबाद (दक्षिण)

## संमत झालेले ठराव

**ठराव पहिला**—पुढील व्यक्तींच्या निधनांबद्दल संमेलन दुःख व्यक्त करीत आहे—श्री. रा. ब. का. ना. दीक्षित, पुणें; श्री. मोहनीराज शंकर मुळे, नगर; श्री. वासुदेव दामोदर मुंडले, अिस्लामपूर; श्री. रा. पां. वैद्य, गोवें; श्री. रा. का. भिडे, पुणें; श्री. बाबासाहेब देशपांडे, पुणें; श्री. तात्या नेमिनाथ पांगळ, पुणें; श्री. दत्तोपंत कुळकर्णी, तुळजापूर; श्री. यज्ञेश्वर पांडुरंग मेहेंदळे, नागपूर; श्री. वासुदेव वामन फडणीस, नागपूर; श्री. ग. र. दंडवते, बडोदें; श्री. ना. मा. संत, पुणें.

**ठराव दुसरा**—हिंदुस्थानची जी नवीन राज्यघटना होणार आहे तींत सलग महाराष्ट्राचा अेक स्वायत्त प्रांत निर्माण करण्यांत यावा म्हणून आवश्यक ती खटपट करण्यासाठी संयुक्त महाराष्ट्र परिषद् नांवाची अेक स्वतंत्र संस्था मुख्यतः बेळगांव संमेलनांत नेमलेल्या संयुक्त महाराष्ट्र समितीच्या प्रयत्नाने स्थापण्यांत आली आहे याबद्दल या संमेलनास अत्यंत संतोष वाटत आहे.

सदरील संयुक्त महाराष्ट्र परिषदेच्या घटनेंत नमूद केलेले अुद्देश या संमेलनास संमत आहेत.

तसेंच सदर परिषदेच्या जळगांव येथे भरलेल्या प्रतिनिधिसभेंत जे ठराव मंजूर झाले आहेत तेहि या सभेस संमत आहेत.

शेवटीं सदरील परिषदेकडून होत असलेल्या खटपटीस मनःपूर्वक साहाय्य करावें अशी सर्व महाराष्ट्रभाषाभिमानी जनांस या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

**ठराव तिसरा**—निजाम संस्थानांत मराठी भाषा, साहित्य व संस्कृति यांचा अभ्यास, अभिवृद्धि व प्रसार या बाबतींत संस्थानी धोरण प्रतिगामी, प्रतिरोधी व विघातक अशा स्वरूपाचें असल्याबद्दल अनेक महाराष्ट्रीय व प्रादेशिक संमेलनांतून संमत झालेल्या ठरावांच्या द्वारें संस्थानच्या शासनसंस्थेच्या निदर्शनास आतापर्यंत अनेकदा आणण्यांत आलें. तरीसुद्धा या बाबतींत जबाबदार संस्थानाधिकाऱ्यांनी कोणतीहि समाधानकारक योजना करण्याचा प्रयत्न अद्याप केला नाही याबद्दल हें संमेलन तीव्र नापसंती व्यक्त करीत आहे. सर्व प्रकारच्या लोकव्यवहारांत जन्मभाषेलाच प्राधान्य दिलें पाहिजे हें तत्त्व सर्व स्वतंत्र व प्रगमनशील राष्ट्रांनी मान्य केलें असल्यामुळे निजामराज्यांत मराठी भाषेची होत असलेली कुचंबणा व गळचेपी मराठीभाषिक व मराठीप्रेमी लोक यापुढे सहन करूं शकत नाहीत ही गोष्ट हें संमेलन स्पष्ट शब्दांत नमूद करीत आहे.

मराठीची कुचंबणा थांबावी व तिचा योग्य प्रकारें विकास व्हावा या दृष्टीने पुढील योजना हें संमेलन सुचवीत आहे.

(१) निजाम सरकारने या बाबतींत पुढील गोष्टी सत्वर अमलांत आणाव्या अशी अपेक्षा आहे :

(अ) गेल्या पन्नास वर्षांत संस्थानांतील मराठीभाषिकांच्या संख्येंत वाढत्या प्रमाणावर सरकारच्या अनास्थेमुळे जी घट झालेली दिसून येत आहे त्याची सांगोपांग चौकशी करून

ती घट बंद होण्यासाठी जनताविश्वासास पात्र असलेल्या व्यक्तींच्या सहकार्याने परिणामकारक उपाययोजना करण्यांत यावी.

(आ) मराठीभाषिकांकडून करभार घेणाऱ्या सरकारने मराठी माध्यमाचा स्वीकार मराठवाड्यांतील सरकारी शाळांतून व विद्यालयांतून केलाच पाहिजे. त्याचप्रमाणे पाठ्य पुस्तकें, शिक्षकवर्गाची पात्रता या दृष्टीने मराठी विषयाच्या अध्यापनाची सध्याची व्यवस्था सापेक्षतः असमाधानकारक आहे यांत त्वरित सुधारणा होणें अवश्य आहे.

(अि) म. सा. परिषदेच्या प्राज्ञ अित्यादि परीक्षांना मान्यता देअून मराठीच्या अध्यापकांची संख्या आणि पात्रता वाढविण्यांत यावी.

(अी) संस्थानी ग्रंथालयांत अद्ययावत् मराठी विभाग ठेवून मराठवाड्यांत जिल्हा व तालुकानिहाय वाचनालयें अुघडावीं आणि सार्वजनिक ग्रंथालयें उघडण्यास आर्थिक साहाय्य करण्यांत यावें.

(अु) हैदराबाद नभोवाणीवर प्रत्यहीं मराठी कार्यक्रमांस स्थान देअून औरंगाबाद नभोवाणीचें कार्यक्षेत्र अधिक विस्तृत आणि प्रधानत्वें मराठी होण्याची व्यवस्था व्हावी.

(अू) मराठी भाषा, वाङ्मय आणि संस्कृति यांच्या संवर्धनासाठी वाङ्मयीन, अैतिहासिक, सामाजिक अित्यादि संशोधन करणारें अेक कार्यक्षम केंद्र (अॅकाडेमी) निजाम सरकारने पुढाकार घेअून स्थापन करावें. या कामीं मराठवाडा साहित्य परिषद् ही सरकारास सर्व प्रकारचें साहाय्य करण्यास तयार आहे. म्हणून अशा प्रातिनिधिक संस्थेच्या साहाय्याने हें काम त्वरित करावें.

(अे) मराठी वाङ्मयाच्या अभिवृद्धीसाठी खऱ्याखुऱ्या नागरिकस्वातंत्र्याची आवश्यकता आहे. विशेषतः मुद्रणस्वातंत्र्याच्या अभावीं मराठवाड्यांतील जनतेच्या वाङ्मयाभिरुचीवर आणि वाङ्मयनिर्मितीवर अत्यंत हानिकारक परिणाम झालेला दिसत असून परस्थ वृत्तपत्रें आणि नियतकालिकें आणि ग्रंथ यांजवरील अन्याय्य निर्बंधांमुळे त्या परिणामाची तीव्रता अधिकच जाणवत आहे. म्हणून सभा आणि भाषणस्वातंत्र्याच्या बाबतींत अधिक प्रगमनशील धोरण स्वीकारून सरकारने जनतेला खरेंखुरें मुद्रणस्वातंत्र्य दिलें पाहिजे आणि संस्थानाबाहेरील वाङ्मयाच्या प्रवेशावरील बंदी तावडतोब काढून घेतली पाहिजे.

(अै) सरकारी व्यवहारांत मराठी भाषेला सध्या असलेलें स्थान मराठी भाषा बोलणारांची संख्या आणि प्रदेशाचें विशालत्व या दोन्ही दृष्टींनी अत्यंत तोकडें असणें अन्याय्य होय. सरकारी गॅझेट व रिपोर्ट यांच्या मराठी प्रतीहि प्रसिद्ध झाल्या पाहिजेत. आणि मराठवाड्यांतील ग्रामाधिकाऱ्यांच्या दप्तरांपासून सर्व लोकोपयोगी खात्यांचा व्यवहार मराठींतून झाला पाहिजे.

(२) वरीलप्रमाणे सरकारकडून अपेक्षा पुऱ्या व्हाव्या असें असलें तरी निजामशाहींतील मराठीभाषिक जनतेने यापुढे स्वस्थ न बसतां आपल्या जन्मभाषेच्या सेवेसाठी तत्परतेने पुढे यावें व महाराष्ट्रांतील कार्यकर्त्यांच्या साहाय्याने पुढील कार्यक्रम पार पाडावा अशी या संमेलनाची सर्व मराठीप्रेमी लोकांस आग्रहाची विनंती आहे.

(अ) मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृति यांच्या अुन्नतीविषयी सतत जागरूक राहून आपलें कर्तव्य पार पाडावें.

(आ) मराठी भाषेच्या पायाशुद्ध अभ्यासाचें महत्त्व लोकांस पटवून देअून मराठी शाळा, वाचनालयें अित्यादि स्थापन करणें व पूर्वी स्थापन झालेल्या संस्थांना प्रोत्साहन देणें.

(अि) वरील कार्य योग्य रीतीने पार पाडण्यासाठी व तें कसें पार पडत आहे याबद्दल चौकशी करून वेळोवेळीं आवश्यक वृत्तान्त व निवेदनें प्रसिद्ध करण्यासाठी हें संमेलन पुढील गृहस्थांची अेक कृतिसमिति नेमीत आहे—

१ प्रा. न. र. फाटक, २ श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, ३ प्रा. वा. दा. गोखले, ४ श्री. वा. कृ. नाअीक, ५ श्री. न. शं. पोहनेरकर (आमंत्रक).

या कृतिसमितीस आणखी दोन सभासद स्वीकृत करून घेण्याचा, निधि अुभारण्याचा व आवश्यक ते पोटनियम करण्याचा अधिकार आहे.

वरील कृतिसमितीच्या कार्यास साहाय्य व्हावें म्हणून पुढील सदस्यांचें अेक सल्लागार-मंडळ हें संमेलन नेमीत आहे—

१ प्रा. म. म. द. वा. पोतदार, २ श्री. दा. वि. गोखले, ३ बॅ. श्री. वा. नाअीक, ४ रा. सा. र. लु. जोशी.

कृतिसमितीने शक्य तों कार्यास लवकर आरंभ करावा. संस्थानांतील मराठवाड्यांत दौरे काढावे, जनतेंत जागृति उत्पन्न करून विधायक कार्यक्रम हातीं घ्यावा असा या संमेलनाचा समितीस आदेश आहे. कृतिसमितीने वर्षअखेर आपल्या कार्याचा वृत्तान्त महाराष्ट्र-साहित्य परिषद् व मराठवाडा साहित्य परिषद् यांस सादर करावा. हा वृत्तान्त पुढील संमेलनांत सादर करावा.

**ठराव चवथा**—थोड्याच दिवसांत मराठी भाषा ही संयुक्त महाराष्ट्रांत राजव्यवहाराची भाषा होणार हें अुघड असल्यामुळें कायदा, व्यापार अित्यादि विविध शाखा, तसेंच दैनंदिन व्यवहारांत लागणाऱ्या पारिभाषिक व अितर शब्दांची योजना करणें, त्याचप्रमाणे शुद्ध-लेखनाबाबत वेळोवेळीं अुद्भवणाऱ्या अडचणींचा व मतांतरांचा विचार करून शुद्धलेखनाचे नियम ठरविणें अित्यादि भाषासाहाय्यक कार्य करण्यासाठी तज्ज्ञांच्या समित्या परिषदेने नेमाव्या व हें साहाय्य करण्याचें कार्य अखंड चालू ठेवावें अशी या संमेलनाची परिषदेस विनंती आहे.

**ठराव पांचवा**—मुंबई सरकारने नेमिलेल्या ग्रंथालयसमितीच्या शिफारशीस अनुसरून दर भाषिक भागांत अेक ग्रंथालय स्थापण्याचा अुपक्रम मुंबअी सरकारने हातीं घेतला आणि या कामासाठीं अशा प्रत्येक ग्रंथालयास दरसाल दहा हजार रुपये मदत देण्याचें व सरकारांत असलेले ग्रंथ या ग्रंथालयांस देण्याचें धोरण अंगीकारलें आहे याबद्दल या संमेलनास संतोष वाटत आहे.

परंतु या कामीं सरकारने अशी अट घातली आहे की या ग्रंथालयांसाठी लोकांकडून दहा हजार रुपये प्रतिवर्षी जमविण्यांत आले पाहिजेत. या अटीमुळे मोठीच अडचण अुत्पन्न होअून काम स्थगित होण्याचें निःसंशय भय या सभेस दिसत आहे. म्हणून ही अट काढून टाकावी किंवा ठेवावयाची असल्यास पुष्कळच अल्प मागणीची करावी अशी या संमेलनाची विनंती आहे.

अशा ग्रंथालयाच्या स्थापनेस व चालनेस स्थानिक स्वराज्यसंस्थांनी व जनतेने

अुदारपणें आवश्यक तें सर्व साहाय्य द्यावें व जनताशिक्षणाचें हें साधन परिपूर्ण करण्याचें श्रेय घ्यावें अशी या संमेलनाची विनंती आहे.

ठराव सहावा—शैक्षणिकदृष्ट्या सोलापूर जिल्हा मध्यप्रांतांतून काढून दक्षिण भागांत समाविष्ट केला गेला व त्या कारणानें मराठी भाषा बोलणाऱ्या सर्वसाधारण जनतेची कुचंबणा होत आहे याबद्दल संमेलनास खेद वाटतो व सरकारने याविषयी फेरविचार करावा असा ठराव बेळगांवच्या तिसाव्या संमेलनांत संमत झाला आहे. याबाबत सहानुभूतिपूर्वक या ठरावाचा विचार केला जाअील, अशा अुत्तराशिवाय सरकारने अद्याप कोणतीहि हालचाल केलेली नाही याबद्दल या संमेलनास खेद होत आहे. म्हणून वरील विनंतीप्रमाणे सरकारने आपल्या निर्णयाचा सत्वर फेरविचार करावा अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

---

## नवीन सभासद

कै. चिपळूणकर स्मारकासाठी देणगी दिल्यामुळे झालेले

### आश्रयदाते

( १ ) श्री. मालजी पेंढारकर, कोल्हापूर ( रु. १००१ )

( २ ) श्री. चंद्रशेखर गोविंद आगाशे, पुणें ( रु. १००० )

भाषा-वाङ्मय-अितिहास योजनेकरिता देणगी दिल्यामुळे झालेले

### साहायक

( १ ) श्री. पां. वि. गोठोस्कर ( मुंबई ) रु. ५००.

कै. चिपळूणकर स्मारकासाठी देणगी दिल्यामुळे झालेले

### हितचिंतक

( १ ) श्री. दत्तात्रेय गणेश साटे, पुणें ( रु. २५० )

( २ ) सरदार गोविंद बळवंतशास्त्री पटवर्धन ( रु. २०० )

( ३ ) सरदार गोविंदराव कृष्णराव काळे, पुणें ( रु. १५० )

### तहहयात सभासद

( १ ) गो. ल. आपटे, वकील, पुणें ( रु. १०० )

ग्रंथसंग्रहालयास देणगी दिल्यामुळे झालेले

### तहहयात सभासद

( १ ) सौ. कुमुद ओक, नाशिक (रु. १०० )

### साधारण सभासद

( १ ) शिवराम सखाराम सावंत, सोलापूर.
( २ ) केशव मोहनीराज पंडित, पुणें.
( ३ ) पांडुरंग गोपाळ लोहोकरे, पुणें.
( ४ ) रंगनाथ नरहर होनप, पुणें.
( ५ ) म. गो. माटे, पुणें.
( ६ ) सौ. लीलाबाई साठे, पुणें.
( ७ ) दिगंबर दामोदर गांगल, पुणें.
( ८ ) यशवंत मोरेश्वर नानल, कराची.
( ९ ) मारुति सीताराम पेंढारकर, कराची.
(१०) सौ. सुशिला विष्णु अभ्यंकर, कराची.
(११) नारायण राम बखले, गोवा.
(१२) शं. अ. आपटे, वकील, जमखंडी.
(१३) प्रा. स. वा. कोगेकर, पुणें

# परिषद्वार्ता

( चिटणिसांकडून )

**विनंतीः—**(१) नवीन वर्षाची पहिली तिमाही संपली आहे. ज्यांनी अद्याप १९४७-४८ ची वर्गणी पाठविली नाही त्या सभासदांनी आपली वार्षिक वर्गणी रु. ३ म. ऑ. ने अगर अन्य रीतीने कार्यालयाकडे पाठवावी. मागील वर्षाची बाकी असल्यास तीहि कृपा करून पाठवावी.

(२) संमेलनाध्यक्ष प्रा. न. र. फाटक यांच्या अध्यक्षीय भाषणाची प्रत ज्या सभासदांस पाहिजे त्यांनी एक आण्याचे पोस्टतिकिटासह मागणी करावी, म्हणजे प्रत बुक पोस्टाने त्यांजकडे पाठविण्यांत येईल.

**सत्कार—**दि. ४।५।४७ रोजीं ३१ व्या म. सा. संमेलनाचे नियोजित अध्यक्ष प्राध्यापक न. र. फाटक यांचा परिषदेतर्फे मा. प. साहित्यमंदिरांत सत्कार करण्यांत आला. अवधि फारच कमी मिळाल्यामुळे या समारंभास निमंत्रित मंडळीच अुपस्थित होती. सत्कारप्रसंगीं म. म. प्रा. द. वा. पोतदार, रिसायतकार श्री. गो. स. सरदेसाई, श्री. ना. गो. चापेकर, प्रा. श्री. म. माटे, प्रा. रा. श्री. जोग अित्यादींचीं भाषणें झालीं.

**संमेलनः—**मराठवाडा साहित्य परिषदेने बेळगांव येथील संमेलनांत दिलेल्या निमंत्रणान्वयें महाराष्ट्र साहित्य संमेलनाचें ३१ वें अधिवेशन दक्षिण हैद्राबाद मुक्कामीं प्रा. न. र. फाटक यांचे अध्यक्षतेखालीं दि. २२-२३-२४ मे १९४७ रोजीं भरलें. संमेलनाची सर्व प्रकारची व्यवस्था स्वागतमंडळाने अुत्तम रीतीने ठेवली होती. संमेलनाच्या प्रमुख कार्यक्रमाव्यतिरिक्त अितरहि वाङ्मयीन कार्यक्रम झाले. या कार्यक्रमांत म. म. प्रा. पोतदार, प्रा. श्री. म. माटे, श्री. बिंदू, प्रा. देशपांडे, प्रा. सरदार, श्री. वामनराव पुरोहित, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. वि. पां. दांडेकर, प्रा. पंगु, राजकवि यशवंत, श्री. य. रा. दाते, श्री. दातार यांनी भाग घेतला होता. स्त्रियांसाठी स्वतंत्र कार्यक्रम आखण्यांत आला होता. त्यांत सौ. शांताबाई माडखोलकर, प्रभावतीबाई केसकर, कृष्णाबाई काळे, सौ. शांता शेळके, सौ. मथुराबाई द्रवीड इत्यादि स्त्री-साहित्यिकांचीं व्याख्यानें झालीं. संमेलनांत संमत झालेले ठराव अन्यत्र दिले आहेत. या ठरावांपैकी मराठवाड्यासंबंधीचा ठराव फार महत्त्वाचा असून त्यासंबंधी जी खटपट करावयाची ती कृतिसमिति करणार आहे. म. सा. परिषदेनेहि या कृतिसमितीच्या कार्याला साहाय्य करण्याचें ठरविलें आहे. संमेलनप्रसंगीं ऐतिहासिक महत्त्वाचें असें प्रदर्शन कार्यकर्त्यांनी मोठ्या उत्साहाने भरविलें होतें. करमणुकीसाठी काव्यगायन व नाट्यप्रयोग यांची योजना केली होती.

संमेलन यशस्वी करण्याच्या बाबतींत हैदराबाद येथील कार्यकर्त्यांनी अत्यंत परिश्रम घेतले याबद्दल परिषद् त्यांची आभारी आहे.

स्वागताध्यक्ष बॅ. श्रीधरपंत नाअीक, कार्याध्यक्ष श्री. वासुदेवराव नाअीक, चिटणीस श्री. कहाळेकर, प्रदर्शन चिटणीस श्री. पोहनेरकर, वसतिगृहाधिकारी श्री. भि. कृ. वाघमारे, भोजनगृहाधिकारी प्रा. माढेकर, श्री. गोपाळराव जोशी, सभागृहाधिकारी श्री. वासुदेवराव हर्डीकर, करमणूकसूत्रधार डॉ. भा. गो. रानडे, स्वयंसेवकाधिकारी श्री. वि. कृ. भावे, सौ. किर्लोस्कर, रावसाहेब र. लु. जोशी अित्यादि अनेक कार्यकर्ते संमेलनाच्या सिद्धतेसाठी कित्येक दिवस झटत होते. संमेलनाच्या यशाचें सर्व श्रेय या अुत्साही कार्यकर्त्यांनाच दिलें पाहिजे.

**कार्यकारी मंडळाची सभा**—दि. ४ मे १९४७ रोजीं व दि. १९।६।४७ रोजीं कार्यकारी मंडळाच्या सभा झाल्या. संमेलनांत संमत-झालेल्या ठरावांच्या अंमलबजावणी-संबंधी नियामक मंडळाकडे करावयाच्या शिफारशींचा मुख्यतः पहिल्या सभेंत विचार आला. पत्रिकेच्या संपादकाचे जागीं श्री. य. दि. पेंढरकर यांची निवड करण्यांत आली. दुसऱ्या सभेंत चालू वर्षीं व्हावयाचीं व्याख्यानसत्रें, समालोचनात्मक व्याख्यानें, मराठी भाषा व वाङ्मय यांच्या अितिहासाची योजना अित्यादि कार्यक्रम निश्चित करण्यांत आले.

**नियामक मंडळाची सभा**—ता. ३०।३।४७ रोजीं नियामक मंडळाची सभा म. म. प्रा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली मा. प. साहित्यमंदिरांत भरली होती. या सभेंत गतवर्षींचा हिशेब, अितिवृत्त, १९४७–४८ अंदाजपत्रक, ग्रंथालय, सभागृहयोजना, अित्यादींबद्दल वार्षिक सभेकडे करावयाच्या शिफारशी संमत करण्यांत आल्या.

**वार्षिक साधारण सभा**—परिषदेची वा. साधारण सभा हैदराबाद येथील संमेलन प्रसंगीं म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली विवेकवर्धिनी संस्थेच्या दिवाण-खान्यांत ता. २३ व २५ मे १९४७ रोजीं भरली. गतवर्षींचा जमाखर्च, अितिवृत्त, १९४७–४८ चें अंदाजपत्रक, नियामक मंडळाने शिफारस केलेल्या ग्रंथालय-सभागृह अित्यादि योजना या सभेंत संमत करण्यांत आल्या. म. सा. साहित्यपत्रिकेची प्रत सभासदांस फुकट पाठविण्यांत यावी हा घटनेंतील नियम रद्द करावा आणि रु. २ अधिक आगाऊ घेऊन सभासदांस म. सा. पत्रिकेचा अंक द्यावा अशी शिफारस नियामक मंडळाने केली होती. त्यासंबंधी बरीच चर्चा होऊन हा ठराव फेरविचारासाठी नियामक मंडळाकडे पाठविण्यांत आला.

**सभासदांस व शाखासभांस विनंति**—वरील ठरावासंबंधींचीं आपलीं मतें कृपा करून सर्व शाखासभांनी व सभासदांनी कार्यालयाकडे २० ऑगस्ट १९४७ पर्यंत पाठवावीं अशी विनंती आहे.

पुढील वर्षींच्या संमेलनासाठी मुंबई मराठी साहित्यसंघाकडून आलेलें निमंत्रण स्वीकार ण्यांत आलें आहे.

**परिभाषामंडळ**—परिभाषा मंडळाचे सदस्य प्रा. सखारामपंत आपटे यांचा 'अणुगर्भीय परिभाषा' हा लेख प्रस्तुत अंकांत आहे. इंग्रजी पारिभाषिक संज्ञा वर्णानुक्रमाने घेतल्या असून त्यापुढे स्वभाषेंतील पारिभाषिक संज्ञा दिल्या आहेत. अगदी अद्ययावत् भौतिक शास्त्रीय ज्ञान हा लेखाचा विषय असून असें ज्ञान परिभाषेंतून संपादित केलेला वाचक लेखकाच्या डोळ्यां-समोर आहे. असें गृहित धरलें आहे की असा भौतिकविद्यासंपन्न विद्वान् स्वभाषेच्या सामर्थ्या-विषयी पूर्ण श्रद्धा बाळगून असतो. परंतु हें सामर्थ्य व्यक्त करण्याचें कार्य अजून त्याच्या हातून झालेलें नाही. अेखादी बलवर्धक अन्नाच्या लहान लहान गोळ्यांची बाटली आपणाजवळ बाळगावी आणि तिच्यांतून अेकेक बारीक बारीक गोळी खूप खूप पाणी घालून वापरावी अशासारखा कांहींसा अुपयोग प्रस्तुत टिप्पणींचा वेळेवेळीं कित्येकांनी केल्यास परिणामकारक होण्यासारखा आहे असें वाटतें.

**व्याख्यानें**—शुक्रवार दि. २० जून १९४७ रोजीं डाका विद्यापीठांतील संस्कृताचे प्राध्यापक डॉ. सुशील कुमार दे यांचें 'वंगीय वाङ्मय' या विषयावर व्याख्यान झालें. परि-षदेतर्फे डॉ. दे यांचा सत्कार करण्यांत आला.

**परीक्षावर्ग**—दरसालप्रमाणे प्राज्ञ व विशारद परीक्षांसाठी मा. प. साहित्यमंदिरांत वर्ग सुरू झाले असून वर्गांत अुपस्थित विद्यार्थ्यांची संख्या समाधानकारक आहे.

---

# साभार स्वीकार

१ दीपिका (नाटिका)— ले० बाळकृष्ण दामाडे; प्रका० बा. मा. दामाडे, लष्कर, ग्वाल्हेर; मूल्य आठ आणे.

२ ख्रिस्तधर्मीयांस गांधींचें आव्हान—अनु० व प्रका० शं. वि. टकार, नंदूरबार; मूल्य साडेतीन रुपये.

३ ध्रुव (घटनासमिति विशेषांक)— संपा० रा. प्र. कानिटकर; प्रका० चित्रशाळा प्रेस, पुणें; मूल्य अेक रु.

४ दै. अग्रणी प्रभाकर शिवजयंती विशेषांक—संपा० व. रं. पंडित; प्रका० हिंदुराष्ट्र प्रकाशन लि.; मूल्य अेक रुपाया.

५ दुहिता ( काव्यसंग्रह )— कवि वि. ज. सहस्रबुद्धे; प्रका० ना. तं. कातगडे; मूल्य दोन रुपये.

६ मुमताज ( लघुकथासंग्रह )— ले० डॉ. अ. वा. वर्टी; प्रका० वा. वि. भट; मूल्य तीन रुपये.

७ राष्ट्रवाद—ले० श्री. य. कोल्हटकर; प्रका० य. गो. जोशी; मूल्य दोन रुपये.

८ माटे-व्यक्ति आणि वाङ्मय (माटे सत्कार समितीतर्फें)—प्रका० य. गो. जोशी; मूल्य पांच रुपये.

९ आश्रमसंगीत—संपा० कुन्दर दिवाण; प्रका० राधाकृष्ण बजाज, मंत्रि, ग्रामसेवा-मंडळ, वर्धा; मूल्य दीड रुपाया.

१० केशवसुत— ले० रा. श्री. जोग; प्रका० के. भि. ढवळे, मुंबई २; मूल्य साडेसहा रुपये.

११ संगीत भावबंधन—ले० राम गणेश गडकरी; प्रका० स. कृ. पाध्ये; मूल्य साडेतीन रुपये.

१२ सकस आहार—संपा० श्री. ज. बापट, अेम्. पी. अेच्. सी.; प्रका० अेस्. जे. बापट, धारवाड; मूल्य अेक रुपाया.

१३ मुक्तात्म्यापासून प्रमद्वरेपर्यंत (श्री. माडखोलकर यांच्या कादंबरीचें टीकात्मक विवेचन)—ले० प्रा. रा. शं. वाळिंबे; प्रका० श्रीकृष्ण गोपाळ आणि कं., पुणें २; मूल्य पांच रुपये.

१४ मराठी निबंध (तंत्र आणि विकास)—ले० प्रा. म. वि. फाटक; प्रका० जनार्दन गणेश जोशी, जनार्दन सदाशिव लिमिटेड, पुणें २; मूल्य अडीच रुपये.

१५ लोकमाता (भारतीय नद्यांचें वर्णन)—ले० द. बा. कालेलकर; प्रका० नवजीवन प्रकाशन मंदिर; मूल्य अेक रुपाया.

१६ नवें शिक्षण—ले० अ. रा. कामत; प्रका० देशमुख आणि कं., पुणें; मूल्य ६ रु.

१७ कोथिंबिरीच्या काड्या ( अेकांकिकासंग्रह )—ले० मनोहर माधव आळतेकर; प्रका० पद्मजा प्रकाशन, बडोदा; मूल्य साडेतीन रुपये.

